महानुभाव महाकवी नरेंद्रपंडित यांच्या

# रुक्मिणी स्वयंवर

ह्या रसाळ काव्याचा भावानुवाद

आनंद साधले

व्हीनस प्रकाशन : पुणे तीस

आवृत्ती पहिली : ऑगस्ट १९८०

ब्लॉक्स : व्ही. जोशी अँड कंपनी, पुणे

मुखपृष्ठ छपाई : स्वरूप मुद्रण, पुणे

मुद्रक :
नाना डेंगळे
साधना प्रेस : ४३०/३१ शनिवार पेठ : पुणे ४११ ०३०

प्रकाशक :
सदाशिव कृष्ण पाध्ये
व्हीनस प्रकाशन : तपश्चर्या : ३८१ क, शनिवार पेठ : पुणे ३०

**विद्वत्तेचा रसिकतेशी—**

आणि

**शास्त्राचा लालित्याशी—**

सुंदर संगम होऊ शकतो ही सुगंधी जाणीव—
मी स्वत: मनाने उमलत असताना—

**‘अभिनव काव्यप्रकाश’**

या ग्रंथाने मला दिली.
त्या थोर ग्रंथाचे लेखक म्हणून—
आणि—
मला अत्यंत आवडणाऱ्या, विरहतरंग, या—
माधवराव पटवर्धनांच्या दिव्य काव्यग्रंथाचा
रससौरभ हिरीरीने पुरस्कृत करणारे थोर रसिक म्हणून
प्रा० रा. श्री. जोग मला प्रिय आहेत.
त्यांच्या स्मृतीस हा ग्रंथ समर्पित आहे.

१५ ऑगस्ट १९८० **आनंद साधले**

# भूमिका

'नरेंद्रपंडिताचे रुक्मिणीस्वयंवर' हा ग्रंथ महानुभाव पंथाने पवित्र मानलेल्या सात ग्रंथांतील एक ग्रंथ आहे. मराठीच्या भाषाशास्त्राच्या दृष्टीने पहाता महानुभावांचे ग्रंथ सांकेतिक लिपीत लिहिले गेले, ही घटना मोठी भाग्याची मानली जाते. कारण त्यामुळे तत्कालीन मराठी भाषेचे स्वरूप एका अनुस्वाराचाही फरक न होता जसेच्या तसे लिपिबद्ध राहिले आणि पुढील अभ्यासकांना उपलब्ध होऊ शकले. ही घटना अपूर्वाईची तर खरीच, पण याच घटनेचा परिणाम असाही झाला की महानुभावीय ग्रंथाच्या रसास्वादाला सामान्य वाचक पारखा झाला. सांकेतिक लिप्यांचे गूढ फोडण्याचा रोमांचकारी पराक्रम इतिहासाचार्य राजवाडे यांनी केल्यानंतर हळूहळू हे रसभांडार मराठीच्या महानुभावपंथेतर वाचकांना उपलब्ध होत आहे. पण अजूनही या उपलब्धीत सुलभता नाही. कारण या ग्रंथाचे आज देवनागरीत जे अवतार होतात ते सारे अभ्यासकांच्या सोयीसाठी असतात. रसिकाला जिद्द असेल तरच तो या अभ्यासकांशी दहीकाल्याची झुंबड लावून चार दोन रसबिंदू मिळवू शकतो.

गीतेचा अनुवाद आणि ज्ञानेश्वरांचा वारसा या दोन वरदानांमुळे ज्ञानेश्वरीला जी दार्शनिक आणि पंथीय प्रतिष्ठा लाभली आहे ती उणे केली आणि अमृताशी पैजा मारणारा रसरूपाळ ग्रंथ म्हणूनच जर ज्ञानेश्वरीचा विचार केला तर ज्ञानेश्वरीला रसरूपाळतेचे जे तेजोमधुर लेणे लाभलेले आहे त्याच्याच पंक्तीत रुक्मिणीस्वयंवराची रसरूपाळता— जरा बाजूला का असेना— पण बसू शकते. इतका हा ग्रंथ रससुंदर आहे. वारकरी पंथाच्या लोकप्रियतेबरोबर ज्ञानेश्वरीही लोकमान्य झाली. महानुभाव पंथाच्या समाजविमुखतेबरोबर त्यांचे ग्रंथही उपेक्षित होत गेले. परंतु ज्यांना पंथीय अभिनिवेशाचे सोयरसुतक नाही, ज्यांना तत्त्वज्ञानाचा काथ्याकूट मानवत नाही अशा सामान्य वाचकालाही मराठी भाषेचा एक वारसा म्हणून ज्ञानेश्वरीइतकाच रुक्मिणीस्वयंवरासारख्या ग्रंथावरही हक्क आहे. या हक्काची जाण बाळगून हा भावानुवाद करण्यात येत आहे. हा अनुवाद म्हणजे अभ्यासकासाठी केलेले शब्दशः सुगमीकरण नव्हे. तर रसिकांसाठी सादर केलेला ग्रंथाचा मनमोकळा गोषवारा आहे. परंतु हा अनुवाद काटेकोर नसला तरी स्वैरही नाही. मूळ ग्रंथातील कोणतीही ओवी अथवा कल्पना इथे डावललेली नाही. रसाळ लेखकांच्या पंक्तीत बसण्याची माझी योग्यता नाही हे माझे मीच जाणतो. नरेन्द्राचा मूळ ग्रंथही तर रससुबत्तेची नुसती महानदी आहे. या महानदीत पोहताना माझे टिचभर

सामर्थ्य उणे पडणार आहे याची मला जाणीव आहे; परंतु माझ्याहून अधिक समर्थ माणसे हे काम करीत नाहीत तोवर माझ्या सामर्थ्याला झेपेल तेवढे करण्याचे मी ठरविले आहे. माझा अधिकार उणा असला तरी माझी निष्ठा आणि माझे प्रेम यांच्या आधारावर माझी धिटाई क्षम्य ठरेल अशी मला आशा आहे.

रुक्मिणीस्वयंवराचा कर्ता नरेन्द्रपंडित हा ज्ञानेश्वरांना समकालीन होता. देवगिरीचा उपान्त्य मराठा राजा रामदेवराव यादव याच्या राजसभेत तो बसे. त्याने रुक्मिणी-स्वयंवराची रचना केली आणि आपला ग्रंथ राजसभेत वाचून दाखविला. तो ग्रंथ त्यातील रसाळपणामुळे रामदेवाला इतका आवडला की तो त्याच्या स्वतःच्या नावाने प्रसिद्ध व्हावा अशी लोभी इच्छा त्याला झाली. त्याने ती इच्छा प्रकट केली व नरेन्द्राला भारंभार सोने त्याबद्दल देऊ केले. राजाची इच्छा ही आज्ञा असते. तिचे पालन अटळ असते. नरेन्द्राला मोठा पेच पडला. पोटचे पोर दरोडेखोराला विकण्याची सक्ती व्हावी तसा तो प्रसंग. नरेन्द्र राजाला म्हणाला की राजाच्या नावावर ग्रंथ प्रसिद्ध करणे असेल तर तो संपूर्ण निर्दोष असणे बरे. त्यासाठी एकदा त्यावर नजर फिरवून तो ग्रंथ राजाला अर्पण केला जाईल असे सांगून नरेन्द्र घरी आला. तो आणि त्याचे दोन भाऊ यांनी रातोरात बसून ग्रंथाची नक्कल करावयास प्रारंभ केला. रात्रभर जागून फक्त नऊशे ओव्या लिहून पूर्ण झाल्या. सकाळी राजाचे दूत आले आणि त्यांनी मूळ ग्रन्थ जप्त करून नेला.

राजसत्तेच्या या पाशवी दर्शनामुळे नरेन्द्र राजसभेला विटला. आणि महानुभाव पंथात दाखल झाला. जाताना त्याने जिथवर नक्कल करून झाली होती तेवढाच आपला ग्रंथ बरोबर नेला होता. तो तेवढाच ग्रंथ महानुभावात मान्यता पावलेला आहे.

प्रस्तुत भावानुवादकाचा सर्वच साहित्याशी संबंध रसास्वादाशी आहे. महानुभाव साहित्याशीही तो तसाच आहे. पहिला महानुभाव ग्रंथ वाचनात आला, तो भास्कर-भट्टाचा शिशुपालवध. हा ठाणे येथील ग्रंथालयाने पहिल्यांदा प्रकाशित केला आहे. ठाण्यातच मुक्काम असताना त्रेचाळीस–चव्वेचाळीस साली तो वाचला. तो खूप मनात शिरून बसला. त्यातील रसाळतेचे उदाहरण म्हणून ओलेत्या स्त्रीचे एक वर्णन इथे देता येईल.

पूर्णचंद्राडौनि आभाळु काढिलें
की शृंगारे पाहाळ उपटिले
तैसे अवयेवु उमटले ॥ वालिपे आडौनी ॥
नितंबु आलिंगनी सुखाविले
बांधिता आसुवे गाळौ लागले
तेविं केशकळांपु मिर्वले ॥ उदकबिंदु स्तव ॥

पहिल्या ओवीत ओल्या वस्त्रातून दिसणाऱ्या कामिनीच्या अवयवाचे वर्णन आहे. ही कामिनी न्हात होती तेव्हा तिने केस मोकळे सोडलेले होते. त्यामुळे हवाहवासा वाटणारा तिच्या नितंबाचा स्पर्श त्यांना होत होता. न्हाणे संपल्यावर ती केस बांधू लागली. तेव्हा नितंबाच्या स्पर्शाचे सुख संपले म्हणून ते केस रडू लागले अशी कल्पना ओल्या केसांच्या टोकांतून गळणाऱ्या थेंबांवर दुसऱ्या ओवीत आहे. संस्कृत महाकाव्यातील सौंदर्यांचा आस्वाद घेऊन तृप्त झाल्यावरही भूल पडावी अशी ही सुंदर कल्पना आहे. त्यामुळे मी महानुभावांच्या इतर ग्रंथांच्या शोधात होतो. तेवढयात प्रा. कोलते यांची प्रस्तुत ग्रंथाची आवृत्ती माझ्या हाती आली. ती साऱ्या अपेक्षा पुरवून उरावी अशी रसपूर्ण होती. परंतु प्रत्येक ओवी लावून वाचावयाची म्हणजे आस्वादात खंड पडतो. हा खंड तापदायक वाटला म्हणून अनेक विशेष सुंदर वाटलेल्या स्थळांचा अनुवाद स्वतःसाठी केला. तो त्रुटित होता. सदुसष्टसाली मी तो पुरा केला आणि त्याच साली तो धारावाही स्वरूपात ‘ नंदा ’ मासिकात प्रकाशित झाला. आता अकरा वर्षांनंतर तो ग्रंथरूपाने प्रकाशित होत आहे.

‘ व्हीनस ’ सारख्या अत्यंत प्रतिष्ठित संस्थेकडे हा ग्रंथ घेऊन जाण्याचे धाडस मला मुळीच झाले नसते. माझे स्नेही आणि हितचिंतक प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी मला ग्रंथ ‘ व्हीनस ’कडे नेऊन द्यायला सांगितले. त्याप्रमाणे मी तो दिला होता. त्यांच्या सवडीने तो आता प्रकाशात येत आहे. आयुष्याच्या उत्तरकाळी इतक्या मोठ्या संस्थेशी संबंध यावा ही गोष्ट अभिमानाची व धन्यतेची आहे. प्रा. कुलकर्णी यांच्यामुळेच ही संधी आली म्हणून मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

मध्यंतरीच्या काळात प्रा. सुरेश डोळके यांनी हा संपूर्ण ग्रंथ संकेत लिपीतून उलगडून प्रकाशित केला आहे. परंतु त्याच्या प्रकाशनानंतर लगेच त्याच्यासंबंधी वाद उत्पन्न झालेले आहेत. त्यांचा निर्णय अजून लागलेला नसल्याने त्यासंबंधी आजच काही सांगता येत नाही.

हा ग्रंथ प्रा. रा. श्री. जोग यांना मी अर्पण करीत आहे. हे समर्पण स्वीकारले या साठी मी प्रा. जोग स्मारक-समितीसाठी प्रकाशक श्री. स. कृ. पाध्ये यांचा ऋणी आहे.

आनंद साधले

अक्षयतृतीया ’७८
चिरंतन ३-६-४६७/४
हैदराबाद ५०००२९.

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १० | १८ | प्रसाद फळांनी | प्रसादफळांनी |
| ११ | २४ | मिळून | मिसळून |
| १२ | १३ | कापूरासारख्या० | कापुरासारख्या |
| १३ | २० | कुंचाभर | कुडचाभार |
| २० | १९ | स्पर्शमुखाच्या | स्पर्शसुखाच्या |
| २२ | ५ | थके | थबके |
| २२ | २२ | अंशी | अशी |
| ३४ | १६ | अप्सरांनी; | अप्सरांनी, |
| ३६ | २६ | तिला | त्याला |
| ३८ | १ | अभिनंदन | अत्रि नंदन |
| ५० | २ | किन्नरला | किन्नराला |
| ५५ | ४ | पंचारतीची | पंचारतीच्या |
| ६३ | १८ | झेपवावा | झेपावावा |
| ६५ | १५ | अंधार राजाने | अंधारराजाने |
| ६५ | १९ | संध्या रंगाची | संध्यारंगाची |
| ६७ | १३ | भुगटी | भुकटी |
| ७० | ७ | खरे | खरा |

# रुक्मिणीस्वयंवर

## १

### उमासुत गजाननाचे स्मरण

माता उमा आणि पिता शंकर यांचा लाडका कुमार गजानन हा जसा शंकराच्या गणांच्या समुदायाचा नायक आहे तसाच तो कृष्णाचे गुणगान करण्यासाठी इथे जमलेल्या आम्हा भक्तगणांना आमच्या गुणकीर्तनात यश देणारा आमचा सर्वसत्ताधीश ईश्वरही आहे. शिंदुराचा शृंगार करणाऱ्या या देवाची कांती काय वर्णावी! सतत प्रदक्षिणा घालणाऱ्या सूर्याच्या ज्वलत्कान्त किरणांचा शृंगार केल्यावर सुवर्णाचा मेरू पर्वत जसा कान्तिझळाळ दिसतो तसाच हा देव गजानन कान्तीने झळकत असतो. अणिमा, महिमा, गरिमा अशा ज्या आठ महान सिद्धी आहेत त्यांचा उद्भव या देव गजाननामुळेच होतो. सुगंध, स्त्री, वस्त्र, गीत, तांबूल, भोजन, शय्या आणि भुवन हे जे आठ प्रमुख भोग आहेत तेही गणपतीच्या कृपेनेच लाभतात. सर्व देव स्वर्गसुखाचा अनुभव घेत असतात तेही याच्या कृपेमुळेच. याच्या कृपादानाचा सतत प्रवाह हा पवित्र मन्दाकिनीच्या प्रवाहासारखा ओघवान असतो. या कृपानदीच्या काठावरील ओलाव्यातच विद्यांची नन्दनवने बहरतात. गणपतीच्या शुभ्र दन्ताचा सूर्यतेजस्वी प्रकाश पडला की विघ्नांचा अंधार नाहीसा होतो. या गणराजाचे रूप इतके सुन्दर आहे की, त्याच्याशी चढाओढ करणारे सारे देव त्यापुढे पराभूत होत असतात. या गणराजाची कवीवर कृपा झाली आहे आणि त्याने मोठ्या कौतुकाने शब्दांच्या सृष्टीचे साम्राज्य त्यांना बहाल केले आहे. या साम्राज्याची रहाटी मनोरथावर आरूढ होऊन फिरणाऱ्या प्रतिभाशक्तीने होत असते. जणू राजमुद्राच अशी ही प्रतिभा गणपतीने माझ्याही स्वाधीन केली आहे. ‘तुझी कविता लोकमान्य होईल’ असा मङ्गल आशीर्वाद त्याने मला दिलेला आहे. आणि हा आशीर्वाद मिळाल्यावर रसाळ वाङ्मयकृती हेच जिचे अलङ्कार आहेत अशी देवी सरस्वती माझ्यापुढे प्रकट झाली आहे.

✠ ✠ ✠

२

## शारदेचे गुणगान

चिरकुमारी अशी ही शारदा कवींच्या समुदायाची मार्गदर्शिका आहे. शब्दांच्या सृष्टीची संचालिका आहे. गोदावरीप्रमाणे पुण्यपावन असणाऱ्या साऱ्या वाङ्मयनदीचे ती उगमस्थान आहे. या शारदेच्या अंगच्या तेजामुळे मोत्यांचे तेज लाजून तिला शरण आलेले आहे. आणि बटमोगरीच्या टपोर फुलांच्या गवसणीआड लपून तिची पूजा करण्याच्या मिषाने तिच्या अंगावर मिरवत आहे. ही शारदा सर्व विद्यांची अधिष्ठात्री आहे आणि त्यामुळे हिची यथार्थ स्तुती करण्याचे सामर्थ्यच कुठच्याही विद्येजवळ नाही. हिच्या रूपाचा प्रकाश पौर्णिमेच्या चांदण्यासारखा धुंदमदिर आहे. या चांदण्यात न्हाणाऱ्या प्रतिभावृत्तीला बहर आला म्हणजेच सृष्टीतील गूढांची प्रमेये कवीसमोर उकलू लागतात. लाडक्या कविबालकांचे कौतुक करणे हाच या कुमारीमातेचा मनोविनोद आहे. त्यामुळे ती हौसेने नवरसांचे बासुंदीसारखे दाट मिष्ठास पेय बनवून ते या महाकवींना पाजीत असते. आणि सामान्य जनांना ऐकू न येणाऱ्या अनाहत नादाच्या पाळण्यात कवींची प्रतिभापालाणित मने उंचावून त्यांना झोके देत असते.

ही शारदा जरी शब्दांच्या राज्याची सम्राज्ञी असली तरीही ती यदुनाथ कृष्णाच्या गुणावर भाळलेली त्याची गुणगायिका आहे. मी आता कृष्णाचे गुणगान करणार आहे, हे ओळखून तिने माझ्याशी मैत्री जोडली आहे. कृष्णाचे गुणगान करावयास लागणारी सर्व सामुग्री तिने माझ्या स्वाधीन केलेली आहे. त्या भगवतीने मोठ्या संतोषाने मला अमृताचा अभिषेक केला आहे आणि माझ्या काव्याला अमरतेचे वरदान दिलेले आहे. नवरसांच्या प्रसाद फळांनी भरलेले प्रसादपात्र तिने माझ्या हातात दिलेले आहे. ही शारदा महाकवींवर करुणा करते तेव्हाच नवरसांचे मेघ येऊन त्यांच्या काव्यांवर रसवर्षाव करतात. आता माझ्या काव्यनिर्मितीच्या मार्गात तिने आपल्या सहायाच्या दीपिका पाजळलेल्या आहेत. विजेच्या दर्शनामागून मेघवर्षाव व्हावा तसा आता या दीपिकांच्या तेजामागून माझ्या या काव्यात नवरसांचा पाऊस कोसळणार आहे. कवीच्या मार्गात शारदेच्या कृपेच्या दीपिकांचा उजेड असेल आणि त्याच्या नेत्रात कृष्णचरित्राचे रहस्य समजावून देणाऱ्या गुरूच्या कृपेचे अंजन असेल तरच त्याला कृष्णकथेतील रसाळ सौंदर्याच्या रहस्यमय निधानांचे यथार्थ दर्शन होऊ शकेल.

✠ ✠ ✠

# ३

## भागवतातील कृष्णकथेचे गुणगान

आता कथेला आरंभ होत आहे. माझ्या या काव्यात जी रसाचा आविष्कार करण्याची शैली आहे. ती द्वितीयेच्या चन्द्रकोरीसारखी रेखीव आणि आल्हादक आहे. ही शैली श्रोत्यांना नुसता काव्यास्वादाचा आनंदच देणार नाही तर त्यांना श्रीकृष्णाच्या गुणगानात गुंगवून शान्ती आणि समाधानही देणार आहे. प्रतिदिनी वाढणाऱ्या शुक्ल-पक्षाच्या चन्द्राप्रमाणे श्रीकृष्णाची कीर्तीही वाढती आहे. मी नरेन्द्रकवी त्या कीर्तीचे तशाच चढत्या शैलीने वर्णन करू लागलो म्हणजे या सभेतील श्रोत्यांच्या चित्तातील आस्वादसुखाच्या महासागरालाही भरतीचे चढते उधाण येणार आहे; आणि ते श्रोते या उसळलेल्या आनंदाच्या लाटांवर नुसते तरंगत राहणार आहेत.

श्रीकृष्णाच्या चरित्राची रसवत्ता काय वर्णावी ! आदिकवी श्री वेदव्यास कवीचा या कथेच्या रसाळपणाविषयी बोलून गेलेला आहे. त्याने वेदांची रचना केली; त्यावर स्मृती रचल्या; पुराणे रचली. परंतु पवित्रपणाच्या बाबतीत त्यातील एकाचीही तुलना श्रीकृष्णकथेशी होऊ शकत नाही हे ओळखून त्याने शेवटी भागवताची कास धरली. आज साहित्याचे भांडार मोठे समृद्ध आहे. त्यात किती तरी नाटके आहेत, काव्ये आहेत, कथा आहेत, आख्याने आहेत, प्रबंध आहेत, चित्रकाव्ये आहेत. परंतु कृष्णदेवाचे पवाडे गाणाऱ्या भागवताशी त्यातील कशाचीही बरोबरी नाही. श्रीकृष्ण म्हणजेच पूर्णा-वतार परब्रह्म होय. देवांचे इतर अवतार हे नुसते अंशावतार असून कृष्णाचे प्रतिनिधी आहेत. हे स्वतः देवांनीच सांगितलेले प्रसिद्ध आहे. त्यामुळे देवकीनंदन कृष्णाची बरोबरी कोणीही देव करू शकत नाहीत. आणि इतर सर्व ग्रंथ आणि शास्त्रे यांचे संशोधन केले तरी श्रीकृष्णप्रभूची चरित्रे गाणाऱ्या भागवताची गोडी इतरत्र आढळणार नाही. शब्दब्रह्म हे एखाद्या लाडावलेल्या खोडकर गाईसारखे असते. भलत्यासलत्याला भलत्या वेळी या गाईचे दूध काढता येत नाही, तसेच शब्दब्रह्माचे मंथन करून निर्मिले जाणारे गोरसासारखे सुमधुर काव्यही भलत्यालाच निर्मिता येत नाही. भलत्याला ते गाताही येत नाही. त्याला व्यासासारखा निर्माता हवा आणि शुकमुनीसारखा वक्ता हवा. सर्व ज्ञानभांडाराचे रुचाळ खाणे मिळून या महाकवींनी ते शब्दब्रह्मरूपी गाईसमोर ठेवले आहे आणि ते खाऊन ती प्रसन्न झाल्यावर कृष्णाच्या लीला वर्णन करणारे अमृतासारखे रसाळ महाकाव्य त्या गाईच्या आचळांतून पिळून काढले आहे. हे महाकवी रसराज होते. रससागर होते. त्यांनी रचलेली काव्ये प्रत्यक्ष चंद्राच्या कलेलाही सौंदर्याचे आव्हान देतात. श्रीकृष्णाच्या चिरसहवासाने सदाचा तृप्त असलेल्या क्षीरसागरलासुद्धा ही रसाळ काव्ये ऐकली की आनंदाचे आणखी भरते येते. या काव्यांच्या सुंदरतेचे वर्णन मी करू

तरी कसे आणि किती ? केशर फुलांनी बहरलेली उंच वेल असावी आणि तिला मोत्यांच्या फळांचे घोस लगडलेले असावेत तसे या कवितेच्या सुंदर वेलीवर अर्थमौक्तिकांनी ओथंबलेल्या अक्षरांच्या लोंबीचे घड लोंबत आहेत. या काव्यातील अर्थाचा सुगंध पसरू लागला की त्यापुढे चंदनाच्या गंधाने माजलेला मलयपर्वतीचा वाराही लाजून शरमतो. यातील अक्षरांची लयदार फेक कामशास्त्रपारंगत तरुणींनाही कटाक्षांची फेक कशी डौलाने करावी याचे धडे देते. शारदोत्सवाच्या दिवसांत पिवळ्या सुगंधाने कोंदलेल्या शेवंतीला बहर येतो. जणू या शेवंतीच्या घाटदार टपोर कळ्याच, अशा अर्थगंधी रसशब्दांची लाखोली जेव्हा हे महाकवी ग्रंथ-देवतेला वहातात तेव्हा त्यांच्या गायनात जो रसरंग ओथंबतो तो सुरावर जुळलेल्या वीणेच्या झंकारातील आर्त माधुरीलाही उणेपणा आणतो. केळ जेव्हा चंद्राच्या प्रकाशाच्या अमृतात न्हाते तेव्हा तिच्या उदरात कापुराचे साठे जमतात. भागवताचेही असेच झाले आहे. महाकवींच्या प्रतिभेच्या उन्मेषाचे चांदणे बरसू लागले तेव्हा त्याच्या तुषारांच्या अभिषेकात हे भागवत न्हालेले आहे. त्यामुळे याच्याही आडव्या उभ्या पोतांत कापुरासारख्या. रसगंधी सिद्धान्तांचे अर्थगंभीर साठे जमा झालेले आहेत. ते रसिकांना दिसतात. सौंदर्याने फुललेल्या या भागवतरूपी साहित्य-कुंजातून रसाने ओसंडणारे प्रवाह झुळझुळत आहेत आणि काव्यसुंदरीच्या हातात हात अडकवून धुंद झालेला भावार्थ मस्तीने झुलत झुलत चालला आहे. आदिकवी व्यासाने रचिलेले आणि आदि पुराणिक शुकमुनी याने गायिलेले हे कृष्णकथारसायन भागवत अमृतापेक्षाही अधिक रुचिर आहे. स्थितप्रज्ञ अशा ब्रह्मज्ञानी योग्यांचीही अलिप्तता ढवळून हे कृष्णलीलामृत त्यांना आनंदाची अनुभूती देते आणि सुखाचे भरते आणते.

✠ ✠ ✠

४

## श्रीकृष्णाची महती

श्रीकृष्णाची महती ओळखून जे श्रद्धाभक्तीने त्या गुणकीर्तनात रंगले आहेत तेच महाकवी म्हणून मान्यता पावलेले आहेत. श्रद्धेने जे देवाला ओळखत नाहीत आणि तार्किक ज्ञानाच्या आधारावर स्वतःला ज्ञाते म्हणवितात त्यांच्याविषयी काय बोलावे ! श्रीकृष्ण परमेश्वराचे ज्ञान असे तर्काने होत नाही. त्याचे पूर्ण स्वरूप त्रिभुवनात

आणि तोच कवितेचे रूप घेऊन आता बाहेर ओसंडत आहे. कृष्णाविषयी मला वाटणारी ओढ ही विरहिणीला पतीविषयी वाटणाऱ्या ओढीसारखी आहे. या विरहिणीच्या मनात जे असते ते यथार्थपणे कोण वर्णन करू शकेल ? कितीही वर्णन केले तरी ते अपुरेच असावयाचे. अमूर्त भावांनीच लिहिले गेलेले ते मनोगत रसिक अशा मर्मज्ञ डोळ्यांनीच मूकपणे वाचावयास हवे. पतीच्या ध्यानात रंगलेल्या त्या भावुकेच्या कृती असंबद्ध वाटल्या, शब्द अर्थहीन वाटले तरी त्याआड दडलेले भाव रसिकपणे जाणून घ्यावयास हवेत. माझी स्थितीही त्या विरहिणीसारखीच आहे. मी कृष्णाच्या ओढीने आर्त झालो आहे. त्याच्या गुणांचे मी गायन करणार आहे. शक्यता आहे की माझे हे गायन कुणाला विरहिणीच्या स्वप्नातील ओसणण्यासारखे असंबद्ध वाटेल. परंतु जे रसिक श्रोते आहेत त्यांनी मात्र त्यांतील गर्भित असा प्रेमाने ओथंबलेला भावार्थ ओळखावयास हवा.

✠ ✠ ✠

६

## श्रोत्यांचा गौरव

या सभेत जे श्रोते आहेत ते जाणकार आहेत. शब्दब्रह्माची कमले साहित्यांच्या वाटिकेत उमलली की त्यांतील मकरंदाचा आस्वाद हळुवार जाणिवेने कसा घ्यावा हे जाणणारे ते भ्रमर आहेत. आम्हा मराठी लोकांच्या भाषेत मी आता जे बोल बोलणार आहे त्या बोलांच्या चोखपणाची पारख हे श्रोते नाणेपरीक्षकाच्या जाणकारीनेच करोत. अशा रसिक श्रोत्यांची प्रेमाची हाक ऐकू येते म्हणून तर कवी कविता लिहितात. चातक पक्षी प्रेमाने आर्त होऊन हाक देतात म्हणून तर मेघ पाऊस पाडतात. नाही तर नुसते भूतलावरचे जलाशय भरण्यासाठी कोण पाऊस पाडणार होते ? मर्मज्ञ असा वसंत ऋतू स्वागतासाठी मोहरला म्हणजेच कोकीळ पंचमात गाऊ लागतो. मागाहून त्या नादसुखाच्या समाधीवर राजहंस डुलतात ती गोष्ट वेगळी. ओढीने मिठी मारणारे चंद्रमंडळ उदयास आले म्हणजेच रससमुद्र आगळ्या ऊर्मींनी उसळून त्या चंद्रमंडळाच्या करमिठीत झेपावतो. पण तोच समुद्र अडाणी अशा सूर्याच्या उष्णतेचा वडवानल पेटला म्हणजे त्या अरसिक उपेक्षेने झुरून आटतो. जाणते श्रोते आहेत अशी खात्री असली म्हणजेच कवीच्या काव्यालाही भरते येते. श्रोतेच जर अडाणी असतील तर त्यांच्या अरसिकतेच्या धगीने काव्याची धारा आटून जाते. कविता ही शब्दसुंदरा असते. रसिक

चांदणे आहे. त्या चांदण्याचे वर्णन करणारे हे काव्य मी आता गात आहे. तरी श्रोत्यांनी सावधान असावे.

✠ ✠ ✠

८

## कथेचे महत्त्व

ज्यांची आचळे दुधाने टचटचली आहेत अशा गाईंचे खिल्लार असावे तशी रुक्मिणीस्वयंवराची ही कथा म्हणजे नवरसांनी ओसंडलेली पाणपोयी आहे. ही कथा जशी अनेक भावसौंदर्यांचे भांडार आहे तशीच ती कैवल्यरूप जो श्रीकृष्ण त्याच्या महोदार सौंदर्याची कीर्तिधाराही आहे. ती चौसष्ट कलांच्या आविष्काराला संधी देणारी जणू साहित्यनिधीच आहे. अनेकविध फळांची सिद्धी देणारी ही जणू साधना आहे. सुखाच्या स्वर्गाकडे वर चढविणारी ही जणू सर्वप्रसिद्ध सोपानपरंपरा आहे.

✠ ✠ ✠

९

## रुक्मिणीचा पिता : भीमक

या पृथ्वीचा विस्तार सात द्वीपे आणि नऊ खंडे यात झालेला आहे. त्यातील जंबुद्वीपामधे भारतवर्ष आहे. यातील विदर्भ देशामधे द्वापारयुगात भीमक नावाचा राजा राज्य करीत होता. सोमवंशात जन्मलेला हा राजा जणू त्या वंशाचा अलंकार होता. त्रिभुवने व्यापून टाकणाऱ्या कीर्तीच्या पोटीच जणू याने जन्म घेतलेला होता. विदर्भाची राजधानी कौंडिण्यपूर येथे तो मोठ्या राजसपणाने कारभार चालवीत असे. खरे म्हणजे विदर्भ देश एवढासा लहान. त्याचा तो भीमक राजा. परंतु त्याची कीर्ती मात्र सर्व स्थल-मर्यादा ओलांडून दाही दिशांत न मावावी अशी फैलावली होती. त्या गुणवान राजाच्या एखाद्या गुणाशीही बरोबरी करू शकेल अशा गुणाचा एकही दुसरा राजा नव्हता. लोक धरणीचे वर्णन ती धैर्यवान म्हणून करीत. समुद्राला ते अगाध म्हणत. पण कुठपर्यंत ?

जोपर्यंत त्यांना भीमकाचे दर्शन होत नसे तोपर्यंतच. एकदा त्याचे दर्शन झाले की धरणीचे धैर्य लोपे. सागराची अगाधता आटे. सौंदर्याच्या बाबतीत म्हणाल तर तो मदनालाही पुरत असे. राजनीतीच्या बाबतीत ब्रह्मदेवही त्याच्यापुढे फिका पडे. पराक्रमाचे नुसते वर्णनच ऐकले की शत्रुपक्षीय वीरांचे हृदय तिथल्या तिथे फुटत असे. त्याच्या भांडाराविषयी तरी काय सांगावे ? रत्नांचे डोंगरच जणू करभार म्हणून त्याच्या भांडारात येऊन साचले होते. या धनाची दानेही तो मोठ्या उदार हाताने करी. ही दाने देताना तो जे संकल्प सोडी त्यांच्या पाण्याने पृथ्वीवर एक मोठे सरोवरच भरलेले होते. अहो, प्रत्यक्ष अष्टमहासिद्धीच जिथे त्याच्या दासी होत्या, जिथे संपत्तीची देवता लक्ष्मी, हीच त्याची कन्या म्हणून जन्मली होती, तिथे त्या राजाच्या संपत्तीचे वर्णन करावयाचे तरी कसे ? विष्णूचे शयन ठरलेला क्षीरसमुद्र हा मोठा गुणनिधी आहे असे म्हणतात. पण भीमक हा त्या समुद्रापेक्षाही वरचढ होता. कारण क्षीरसमुद्र हा समुद्रच होता. भीमकाकडे असलेला माणुसकी हा गुण त्याच्याकडे नव्हता. भीमकाकडे तो असल्याने त्याचीच गुणवत्ता चढी होती. गुणाचे एक राहू द्या. पण भीमकाच्या रूपाचे वर्णन करता येईल काय ? शक्यच नाही. अहो, भुवनीच्या सौंदर्याचा निकष असा जो मदन, तो ज्या लक्ष्मीच्या उदरात जन्मला; त्रिभुवनातील सौंदर्याचा रसिक भोक्ता जो श्रीकृष्ण, तो ज्या लक्ष्मीच्या सौंदर्यावर भाळून भीमकाचा जावई झाला; त्या सौंदर्यलक्ष्मी रुक्मिणीचाच अवतार मुळी कन्यारूपाने या भीमकापासून झाला. मग मूर्त सौंदर्यशोभेचा जनक आणि मूलाधार जो भीमक त्याच्या सौंदर्याचे वर्णन करवेल तरी कसे ? असो. सौंदर्यही राहू द्या. त्याच्या आज्ञेचा दरारा कसा होता याचे तरी वर्णन करता येईल काय ? एवढ्याशा एका देशाचा तो राजा. पण त्याच्या आज्ञेचे जे आश्चर्यकारक सामर्थ्य होते त्याचेही वर्णन करता येणे कठीण आहे. अहो, त्या राजाचे नुसते लेकरू रुक्मिणी. पण ती नुसते 'ये' असे म्हणते काय ? आणि तिची आज्ञा मानून चौदा ब्रह्मांडाचा राजा प्रत्यक्ष परमेश्वर कृष्ण द्वारकेहून कौंडिणपुराला लागोवेगी धावत येतो काय ! जिथे मुलीच्या आज्ञेचा इतका दरारा तिथे बापाची आज्ञा काय विचारावी ! हे चराचर विश्व ज्याच्या उदरात सामावले आहे त्या मुरारी श्रीकृष्णाची जावई म्हणून वरपूजा करण्याचे अहोभाग्य या भीमकाला लाभले. त्याची थोरवी तरी कोण जाणू शकणार ? तराजूच्या एका पारड्यात भीमकाच्या धवल यशाची थोरवी घातली आणि दुसऱ्यात पूर्णचंद्राचे चांदणे घातले तरी भीमकाच्या यशाचेच पारडे खाली रहावयाचे. त्यात आणखी आकाशातील सारी नक्षत्रे खुडून जरी चंद्राच्या पारड्यात घातली तरीही काही तो भीमकाच्या यशाच्या धवलतेची बरोबरी करू शकणार नाही.

* * *

१०

## भीमकाचा परिवार

असो. असा तो भीमक राजा कौंडिण्यपूर नगरामधे राज्य करीत होता. शुद्धमती ही त्याची पट्टराणी आणि प्रियपत्नीही होती. तिने रुक्मिया, रुक्मबाहू, रुक्मरथ, रुक्मकेश आणि रुक्ममाली अशा पाच वीरपुत्रांना जन्म दिला. या पाचांच्या मागून धाकटी कुसधुणी कन्या रुक्मिणी जन्माला आली.

* * *

११

## रुक्मिणी

चंद्राच्या रूपाळ बिंबातून ओघळणाऱ्या सुधातुषारांची पुतळी आकाराला यावी तशी ही रुक्मिणी रूपसुंदर होती. मूर्त सौंदर्यदेवताच माणसाचे रूप घेऊन या सृष्टीत जन्माला आली होती. तिचे रूपवर्णन तरी कोणत्या शब्दांनी करावे ! रुक्मिणीच्या रूपाचे वर्णन करताना प्रत्यक्ष शुकमुनीच भागवतामधे म्हणाला आहे की, ‘ अरे परीक्षिता, त्या रुक्मिणी मातेच्या सौंदर्याचे वर्णन करावयाचे तर मला वाटते असे म्हणावयास हवे की लावण्यामधे जी अव्यक्त अशी वेधक आकर्षणशक्ती असते तीच तिच्या रूपात व्यक्त झाली होती. ’ तिच्याकडे पाहून असे वाटे की क्षीरसागराचे जे हृदय सारखे विष्णूचे ध्यान करीत असते तेच आता विष्णूचा अवतार कृष्णरूपाने पृथ्वीवर झाल्यामुळे स्वतःही मनुष्याचे रूप घेऊन अवतरले होते. ज्या श्रीकृष्णाला केवळ एका ब्रह्मरसाचीच गोडी आजवर होती त्यानेही रुक्मिणीच्या अधररसाच्या गोडीवर मोहून चुंबनाने तिच्या वदनाचा सन्मान केला. त्या वदनाच्या सौंदर्याला या विश्वात दुसरी उपमा शोधावयाची तरी कुठे ? आणि रुक्मिणीच्या डोळ्यांतील ते दृष्टिभाव ! त्याची तुलना कमलाशी करावयाची की हरिणीच्या डोळ्यांशी ? छे ! छे !! ही तुलना होईल तरी कशी ? रुक्मिणीच्या दृष्टीला ब्रह्मस्वरूप श्रीकृष्णाच्या दर्शनाचे परमभाग्य लाभले. ते कमलिनी आणि हरिणी यांना कुठून लाभायला ? खरोखर रुक्मिणीच्या राजस सौंदर्यवैभवाचे वर्णन कोणालाही करता येणार नाही. ज्या रूपाला भुलून सदामुक्त अशा प्रत्यक्ष परब्रह्माने पुन्हा संसाराचे बंधन मानून गृहस्थपणा स्वीकारला त्या रूपाचे का वर्णन होऊ शकते ? रुक्मिणीच्या

नुसत्या वदनाचेच सौंदर्यवर्णन करताना जिथे पैलपार लागणार नाही तिथे तिच्या इतर अवयवांचे वर्णन करावयाचे म्हटले तर विस्तार फारच होईल. शिवाय जगन्मातेच्या त्या अवयवांचे असे वर्णन केले तर साधुजनही त्यांचे सहज-मौन आणि अलिप्तता सोडून दूषण देतील. रुक्मिणी जगाला वंद्य अशा कृष्णाची पत्नी आहे. एखाद्या सामान्य बाईच्या अवयवांचे वर्णन करावे तसे रसभरित वर्णन मी तिच्या सर्व अवयवांचे केले तर रसिक श्रोतेही मजवर राग धरतील.

✠ ✠ ✠

## १२

## तरीही थोडे

तरीही भागवतापासून पद्मपुराणापर्यंत रुक्मिणीच्या स्वयंवराची कथा आलेली आहे. तेथे देव श्रीकृष्णासमोर अनेक भाटबंदीजनांनी, यक्षकिन्नरांनी रुक्मिणीचे वर्णन केले आहे. तेच आता मी नरेन्द्रकवीही सांगणार आहे. जे सौंदर्य श्रीकृष्णाला जिंकून त्याच्याही घरात घुसले त्याच्या मोठेपणाचे वर्णन करणे भागच आहे. म्हणून जसजसे प्रसंग येतील तसतसे मी रुक्मिणीचे वर्णन करणार आहे. आता मी जो प्रसंग वर्णीत आहे त्या वेळी ती रूपराणी राजलक्ष्मी रुक्मिणी तिच्या पित्याला भेटण्यासाठी मोठ्या कौतुकाने आणि लाडिकपणे राजसभेकडे जावयास निघाली आहे.

✠ ✠ ✠

## १३

## रुक्मिणीच्या सख्या

अशी ती रुक्मिणी जात असता तिच्याबरोबर तिच्या मैत्रिणींचा थवा होता. चित्रकाराने रेखाटलेल्या आकृती सजीव व्हाव्या तशा त्या सुंदर सख्या दिसत होत्या. त्या

इतक्या सुंदर होत्या की सौंदर्यदेवता म्हणून मान्यता पावलेले जे रती आणि मदन त्यांनीही याच सख्यांची कुलदेवता म्हणून पूजा करून त्यांच्या प्रसादानेच आपले विलो-भनीय सौंदर्य मिळविले होते. चंद्रसरोवरातील यक्षिणी भूमीवर फिराव्या, किंवा चंद्र-किरणांच्या लेकी जन्मास याव्या, किंवा डोळ्यांना आनंद देणाऱ्या सौंदर्यशक्तीच मूर्त आकाराव्या तशा त्या सख्या शोभत होत्या. किंवा असेही वाटत होते की त्या सख्या म्हणजे सौंदर्यशास्त्राची गुरुकिल्ली जाणणाऱ्या विद्याधरीच असाव्या किंवा त्या सुखमय अशा स्वर्ग-लोकीच्या अप्सराच असाव्या. छे ! छे ! असे नाही. या सख्या म्हणजे मदन ज्या फुलांच्या बाणांनी विश्वावर विजय मिळवीत असे त्या फुलांनाच फुटलेले सुंदर अवयव होते. त्यांची गोरी गोरी वदने चंद्रासारखी गोल होती. जसे काही ते चंद्राचे सख्खे भाऊच होते; आणि अमृतमंथनाच्या वेळी जन्माला आलेली आपली कन्या जी लक्ष्मी तिची सेवा करण्यासाठी क्षीरसागराने त्यांना चंद्रामागोमाग बाहेर पाठविले होते. त्या राजस सुंदरी आपल्या पुष्ट अवयवांचा भार डौलाने मिरवीत रुक्मिणीमागून चालल्या होत्या. आपसात बोलताना त्या निःसंकोच अवखळपणाने हसल्या की त्या हसण्याने दाही दिशा प्रकाशित होत होत्या. त्यांच्या डोळ्यांच्या भिरभिरीत जणू मार्गातील सारे लोक अडकत होते. त्यांच्या दृष्टीच्या कटाक्षांबरोबर यांची काळजे वर-खाली होत होती. स्फटिकासारखी झळाळणारी रेशमी मुलायम वस्त्रे त्या सख्या नेसल्या होत्या. स्फटिकाच्या करंड्यांत लपविलेल्या मूर्तींचे तेज त्यातून बाहेर झळझळावे त्याप्रमाणे त्या तलम वस्त्राच्या झुळझुळीत पारदर्शकतेतून त्या सख्यांच्या आवृत अवयवांचे सौंदर्य बाहेर दिसत होते. त्यांनी रत्नांचे अलंकार घातलेले होते. कोपरापासून मनगटापर्यंत असणारी कंकणे त्यांच्या स्पर्शसुखाच्या आनंदाने नाचत किणकिणत होती. त्यांच्या कानांच्या पाळ्यांत झळकणारे रत्नालंकार त्यांच्या नितळ गालांत प्रतिबिंबित झाले होते. सख्यांचा तो थवा रुक्मिणीच्याबरोबर राजसभेकडील मार्गाने चालला असता त्यांच्या पायांतील नूपुर झणकारत होते. आणि आसमंतातील कामी जनांची चित्ते त्या झणत्कारांच्या तालावर नाचताना उन्मत्त होत होती.

✠ ✠ ✠

## १४

### आणि आता रुक्मिणी

त्या सख्यांच्या मधे रुक्मिणीचे रूप जणू काय चांदण्याच्या अर्काच्या जादूमय किमयेचे प्रसाधन केलेले असावे तसे शोभत होते. असे वाटत होते की जणू काय ही निर्दोष रेखाकृती चंद्राच्या आतल्या गाभ्यातूनच कोरून काढलेली होती. ती जणू नयन-

सुखाची स्वयंभू मूर्तीच होती; किंवा तो जणू काय सुगंधच दाटावला होता; किंवा ती म्हणजे शृंगारभावनेची जणू शोभाच सजीव झाली होती; किंवा ती यौवनात नुकतीच पदार्पण करीत असलेली उमा होती. किंवा सौंदर्यलोकातून भूलोकावर उतरलेली तारका होती; किंबहुना ती मूर्त मदनाची जन्मकुंडलीच होती; किंवा ती सर्व सौभाग्याचा साठा होती; किंवा ती रूपसौंदर्याची परमसीमा होती. किंवा पुरुषांना वश करून घेणाऱ्या दिव्य औषधींची ती मूर्त मात्रा होती; किंवा ती क्षीरसागराची कुलदेवता होती; किंवा अमृताचे मूलकारण असे अधिष्ठान होती; किंवा चंद्राच्या सोमवंशालाही पूज्य वाटणारी त्याची कुलदेवता होती. तिच्या वदनाचे दर्शन झाल्यामुळे लाजूनच आकाशीचा चंद्र हिमासारखा थंडगार आणि गोठीव झाला होता. निळया कमलांना लाजविणारे तिचे नयन, हिऱ्यासारखे तेजस्वी तिचे दात आणि माणकासारखे लालचुट्रुक तिचे ओठ आपणापाशी नाहीत याची खंत करून तो चंद्र फिकटला होता. कमळे म्हणजे मदनाचे एवढे भरवशाचे बाण. पण रुक्मिणीच्या कटाक्षांचा टोकदार बोचकपणा पाहिला की ती कमळे हिरमुसली होत. श्यामा स्त्रीलाच शोभून दिसावे असे ते आधीच मदभरे रूप. त्यात आता आणखी तारुण्य अंगात उठावलेले. त्यामुळे ती जे रेशमी पिवळे वस्त्र नेसली होती, त्यावर छाया-प्रकाशाचे मनोहर सौंदर्य दाखविणारे चढ-उतार शोभत होते. तिची अंगकांती मोत्यासारखीच होती. त्या मोतिया कान्तीशी मोत्याच्या अलंकाराचाच सुसंवाद जमे. त्यामुळे मोत्याचेच अलंकार तिने सर्व अंगभर घातलेले होते. तिच्या हातांत मोत्यांचे कडे होते. त्यापुढे मोत्यांचा एक गजऱ्यासारखा हातसर होता. गळयात मोत्यांचे मोहक पेंडे होते. कानांतील मोत्यांचे झुलते झुबके कृत्तिका नक्षत्राच्या तेजाशी स्पर्धा करतील असे चमकत होते. तिच्या नाकात टपोरे मोती होते. ते शुक्राच्या ताऱ्यांप्रमाणे झळकत होते. जणू रुक्मिणी जवळ येताच शंकराने पूर्वी जाळलेला मदन आता पुरुषा पुरुषाच्या मनात सजीव होत असे. मृत अशा मदनाला बहुविध संजीवन देणारी ही संजीवनी आगळीच होती. शुक्राकडे संजीवनी होती खरी. पण ती एकाला एकच संजीवन देऊ शके. त्यामुळे मदनाला लक्ष लक्ष संजीवने देणारी रुक्मिणीची शक्ती आपल्या शक्तीपेक्षा अधिक प्रभावी आहे अशा जाणिवेने ती उसनी मागण्यासाठी शुक्र तिला शरण आला होता आणि अलंकार म्हणून तिच्या नाकात लोंबून तिची सेवा करीत होता. मनाला मोहविणारा मोत्यांचाच सर तिने भांगात गुंफलेला होता. तिच्या केशकलापातील मोत्याच्या सराचे ते वळण शृंगारभावाच्या गंगेच्या ओघवान प्रवाहासारखे झोकदार दिसत होते. पूर्वी कपिल मुनीने सगर राजाचे पुत्र जाळले तेव्हा त्यांचा उद्धार करण्यासाठी स्वर्गातून गंगा अवतरली होती. तोच इतिहास जणू पुन्हा घडत होता. शंकराने जाळून टाकलेल्या मदनाला आव्हानपूर्वक पुन्हा जन्म देऊन त्याचा उद्धार करण्यासाठीच जणू ही शृंगारगंगा मोत्यांच्या सराच्या रूपाने तिच्या भांगात अवतरली होती. रुक्मिणीच्या नितळ त्वचेवर लव अशी नव्हतीच. उदरावर रोमावली आहे असे वाटत असे. पण तो नुसता भासच होता. खरे असे होते

की तिच्या पाठीवर जो वेणी रुळत होती तीच तिच्या नितळ आणि निर्मळ अशा पारदर्शक सौंदर्यातून बिंबित होऊन रोमावलीचा आभास निर्माण करीत होती. तिचे ते रूप इतके सुकुमार होते की तिच्याकडे पाहताना दृष्टीलासुद्धा भीती वाटून ती दृष्टी कुचंबत असे. न जाणो, आपल्या क्षेपणाचा तिला अपाय झाला तर ? अशा भीतीने ती थके-- हिमशीतल असे सुधाकण आकाराला आले आणि त्यांनी तिला स्पर्श केला तरी त्या शीतस्पर्शाच्या उबेनेही ते कोमल रूप कोमेजेल असे वाटत होते. तिचे अंगसौंदर्य आधीच आगळे होते. त्यात आणखी आता तिचे तारुण्य बहरले होते. त्यामुळे तिच्या एकेका अवयवाचे विभ्रम मनाला अगदी मुग्ध करून टाकणारे होते. अहो, तिने स्वरूप-सुंदर पुरुषांचा स्वामी जो श्रीकृष्ण त्यालाच लालूच लावून भुलविले. शंकराने जाळलेल्या मदनाला साजून दिसावा असा मदनमनोहर देह तिने त्याला आपल्या उदरात सजीव करताना दिला. त्या तिच्या रूपाचा जो अप्रतिम असा उठावदारपणा होता त्याचे वर्णन तरी मी काय करू !

✠ ✠ ✠

१५

## रुक्मिणीच्या सेविका

रुक्मिणीच्या बरोबर तिच्या दासीही होत्या. कर्पूरिका नावाची दासी विड्याचे तबक घेऊन तिच्या मागोमाग चालली होती. चंद्रिका रुक्मिणीवर चवरी ढाळीत होती. मयूरिका नावाच्या छत्रधारिणीने तिच्यावर छत्र धरलेले होते. तिला पाणी देणाऱ्या दासीचे नाव सुधावती होते. हरकामी सुलोचना तिच्याबरोबर होती. लेखनवाचनाचे काम करणाऱ्या दासीचे नाव उचितमालती होते. रत्नवती तिला शृंगार चढवीत असे. तिच्या कालसंकेतांची तिला आठवण करून देणारी दासी होती. तिचे नाव चंद्रहंसा होते. सिंधुमती तिला सल्लामसलत देत असे आणि तिला हवे नको यावर नजर ठेवीत असे. मदनकळा ही या सर्व दासींची मुख्य होती. चारुरेखा ही रुक्मिणीची नर्तिका होती. सरस्वती गायनाचे आलाप घेऊन तिला सुखवीत असे. भावकलना ही रुक्मिणीची अगदी आतली अंशी जिवाची सखी होती. अंगसेवा करण्याचे काम शशिकलेकडे होते. या साऱ्या दासी रुक्मिणीबरोबर चालताना विनम्र लाडिकपणे बोलत होत्या, तेव्हा त्यांच्या मुखांतील सुगंध चौफेर पसरत होता. या वेळी रुक्मिणीने उचितचंद्रिकेचा हात आपल्या हातात धरलेला होता. कृष्णाच्या रूपाबद्दल ती त्या सख्यांशी बोलत होती आणि पित्याला भेटावयास राजसभेकडे निघाली होती.

✠ ✠ ✠

## राजसभेत रुक्मिणी

सभेत पोहोचताच रुक्मिणीने आपल्या सख्यांची दाटी दूर सारली आणि ती पुढे सरली. त्या वेळी असे वाटले की ती जणू काय मदनाची दिवटीच आहे आणि त्याने पराभूत केलेले वैराग्य कुठे कुणाच्या हृदयाच्या सांदी-कोंदीत लपून बसले असेल तर त्याला शोधून हुसकावयाला पुढे सरली आहे. पुढे चालत चालत ती राजाकडे जाऊ लागली तसे वाटेत तिच्या सौंदर्याने मंत्रमुग्ध झालेले सभाजन मातीच्या चित्राप्रमाणे तटस्थ झाले. राजाकडे गेल्यावर तिने एकदा साऱ्या सभेवर नजर टाकली. तिची ती दृष्टी पडताच सभाजन घायाळ झाले. आपण शरपंजरीच पडलो असे त्यांना वाटू लागले. लाडकी लेक जवळ आलेली पाहताच भीमकाने तिला दोन्ही हातांनी उचलून हृदयाशी धरले आणि मग मोठ्या कौतुकाने मांडीवर बसविले. नंतर त्याने आपल्या बोटांनी तिच्या ललाटावर भुरभुरणारे केस सारखे केले. तिच्या तोंडात आपल्या हाताने विडा घातला आणि भेटीला आलेली सोन-जांभळे तिच्या हातात ठेविली. लहान मुलाने निर्धोरपणे पाळण्यात बसावे तशी रुक्मिणी त्या राजसभेत पित्याच्या मांडीवर बसली होती. तिचे सौंदर्य सर्व सभेत तळपत होते. व्याधाने पसरलेल्या पाशात हरिण सापडावे तसे त्या सौंदर्याच्या जादूगार पाशात सर्व सभाजन गुरफटले होते. ती आपल्या निळ्या डोळ्यांनी सभेत चौफेर पहात होती. जिथे जिथे तिची दृष्टी पडत होती तिथे तिथे निळी प्रभा आकारल्यासारखे वाटत होते. त्यामुळे तिची दृष्टी सर्व सभेवर फिरली तेव्हा सभेतून निळ्या तेजाचा स्रोत प्रवाहित झाल्यासारखा भास झाला. असे वाटले की पुष्कळ दिवस दुरावलेल्या लाडक्या कृष्णाचे गुणगान आता या सभेत होणार आहे हे ओळखून ते ऐकण्यासाठी निळी यमुना मथुरेहून निघाली होती आणि आवेगाने राजसभेत प्रवेशून गुप्त झाली होती. सरोवरात मासे उसळावे तसे रुक्मिणीच्या त्या दृष्टिक्षेपांच्या पुरातून तिचे नयन तळपत होते. आणि त्यांच्या वेधामुळे सभाजनांची काळजे आडव्या कातरीने भोसकली जावी तशी विद्ध होत होती.

✠ ✠ ✠

१७

# विवाहाचा विचार

मांडीवर बसलेल्या रुक्मिणीकडे भीमकाने पाहिले तेव्हा त्याला जाणवले की तिचे बाल्य संपले होते व तिने मुग्धावस्थेत प्रवेश केला होता. ही जाणीव आकारताच प्रधानाकडे नजर टाकीत तो म्हणाला,

'रुक्मिणी आता उपवर झाली आहे. तिचा विवाह करावयास हवा. तुम्ही म्हणाल 'यात काय कठीण आहे ? स्वयंवर मांडू म्हणजे झाले.' परंतु मला पूर्वी होऊन गेलेल्या वधूपित्यांसारखे गावंढळपणाने वागावयाचे नाही. मला मुलीचे स्वयंवर मांडावयाचे नाही. नेहमीचा अनुभव असा आहे की कन्येला हवा तो वर निवडता यावा म्हणून भोळेभाबडे लोक स्वयंवर मांडतात. आणि हुमदांडगे चांडाळ लोक शस्त्रबळाने त्या स्वयंवराचा विचका उडवितात. ते विरोध करणाऱ्यांच्या तोंडात सक्तीने खड्ग खुपसून जबरीने वधूला पळवून नेतात. मग इतरांना अवकळा आल्यासारखे वाटते. स्त्रीला पळविणाऱ्याच्या मागे लागून त्या राजांचा समूह झुंजू लागतो. स्त्रीच्या पोटी इरेस पडून अनेक कामवेडे मरण पावतात. त्यांतील एक कोणी तरी दंडबळाने विजयी होतो. परंतु तो रणकुशल असला म्हणून कामकुशल असतोच असे नाही. सुसंस्कृत आणि सुकुमार राजकुमारीचा उपभोग रसिकतेने कसा घ्यावा हे त्याला माहिती नसते. जातिवंत राज· विलासी पुरुषाशिवाय इतरांना राजकन्येला सुखी करता येत नाही. या हाणामारीच्या गोष्टीच अगदी असंस्कृत आहेत. ज्यामुळे क्षत्रियांत विनाकारण वैर पडून त्यांचे हातपाय तुटतात अशी तिडी गोष्ट मला मुळीच मान्य नाही. अशी हाणामारी करून पळवून नेलेली कोणती स्त्री सुखी झाली आहे काय ? जे हा रानटीपणा करतात तेच स्वतःला देव म्हणून घेत असल्यामुळे आम्हाला ही गोष्ट मोठ्याने बोलता येत नाही हे खरे. परंतु माझ्या मुलीचे स्वयंवर मात्र मला मुळीच मांडावयाचे नाही.'

हे ऐकून मंत्र्यांना मोठा संतोष झाला. भीमकाने जे चातुर्य प्रकट केले त्याला मर्यादाच नव्हती. असे ते एकमेकांना म्हणाले. त्यानंतर मुख्य प्रधान विनीतपणे म्हणाला,

'महाराज जे बोलले ते बरोबरच आहे. आपण राजकुमारांचा शोध घेण्यासाठी गुप्त हेर पाठवू.'

त्यावर भीमक म्हणाला,

'गुप्त हेरांचे काय काम ? आमच्या राजसभेत जो बुद्धिवान राजकवींचा समुदाय आहे त्यांतूनच एक एकाला आपण एक एका देशात पाठवून राजकुमारांचा शोध घेऊ. मग त्यात जो कुलीन असेल, जो पराक्रमात श्रेष्ठ असेल, तारुण्योचित अशा गुणांनी जो

सर्वांत अधिक चढ असेल आणि जो भाग्यालाही भाग्य वाटावा असा भाग्यवान असेल तो वर आपण नियोजित करू. खरी गोष्ट म्हणाल तर मी सर्व राजांना ओळखतो. एकट्या यदुराज कृष्णाला वगळून मी त्यांतील कोणालाही मानीत नाही. एवढेच नव्हे तर त्यांची एकेकाची आठवण झाली म्हणजे मी त्यांना मनातल्या मनात हसत असतो.'

* * *

## १८

## कल्याणकीर्ती भाटाचे आगमन

भीमक राजा प्रधानाला असे बोलत आहे तेवढ्यात राज्याचा मुख्य वेसकर राजसभेत प्रवेशला आणि राजाला प्रणाम करून हात जोडत विनीत आदराने म्हणाला,

'महाराज, माझे मदतनीस नगराबाहेर फिरत असता त्यांना दुरून एक डिंडिम ऐकू आला. जी वार्ता त्यांनी ऐकली तीच नगरातसुद्धा कुजबुजली जात आहे. कोणी तरी एक भाट मोठ्या लवाजम्यासह आपल्या दर्शनाला येत आहे.'

तेव्हा भीमक म्हणाला,

'होय. आम्हीही हे आधीच ऐकिले आहे. काशीच्या राजाचा कल्याणकीर्ती नावाचा भाट आम्हाला भेटावयास येत आहे. हा भाट राजवंशकीर्तनाच्या त्याच्या पिढीजात कामात मोठा कुशल आहे. नृपस्तुती करण्यात तो मोठा उदार वृत्तीचाही आहे. आम्हालाही भाटांच्या मुखाने आमची कीर्ती दिगंत जावी अशी ओढ आहेच. तुम्ही राजान्त वैभव बरोबर घेऊन त्याला सामोरे जा आणि मोठ्या उत्साहाने त्याचे स्वागत करून शक्य तेवढ्या त्वरेने त्याला आमच्या भेटीला घेऊन या.'

म्हणून त्याने आपला धाकटा बंधू आणि राजसभेतील एक जाणता संगीतकार याची भाटाच्या स्वागतासाठी नियुक्ती केली. भाट लोक हे राजांची कीर्ती देशोदेशी पसरवीत असल्याने ते चंदनाचा सुगंध दूरवर वाहून नेणाऱ्या मलयानिलासारखे राजांना नेहमी स्वागतार्ह असतात. त्यामुळे एखाद्या चक्रवर्तीला शोभून दिसेल अशा सन्मानाने कल्याणकीर्तीला राजाच्या भेटीसाठी आणले गेले. आपल्या मोठाल्या लवाजम्यासह कल्याणकीर्ती सभेत आला तेव्हा त्याला सिंहासनावर बसलेल्या भीमकाचे दर्शन झाले. नक्षत्रांमध्ये पूर्णचंद्र शोभावा तसा तो राजा राजसभेत शोभत होता. राजाची भाटाशी

दृष्टिभेट झाली तेव्हा राजाने त्याला आपल्याजवळ समोर बोलाविले आणि त्याला बसण्यासाठी पोवळ्यांनी जडविलेले आसन देण्याची व्यवस्था करविली.

✠ ✠ ✠

## १९

## भाटाचा आशीर्वाद

राजाकडून मिळालेला सन्मान आणि उपहार यामुळे कल्याणकीर्तीचे मन अतिशय संतुष्ट झाले. त्याने हात वर उचलून राजाला आशीर्वाद दिला. नंतर त्याने योग्य समय ओळखून सोमवंशाच्या कीर्तीचे गायन केले. नंतर भीमकाच्या यशाचा गौरव गाइला. आणि उचित अशा भेटी भीमकाला अर्पण करून पुन्हा आशीर्वादाचा उच्चार केला. त्या वेळी राजानेही त्याच्या स्वतःच्या प्रतिष्ठेला साजेल असा आहेर त्या भाटाला दिला. तो भरघोस आहेर पाहून कल्याणकीर्ती म्हणाला,

'राजा, तू म्हणजे परिपूर्णतेचा एक चालता बोलता प्रवाहच आहेस.'

म्हणून त्याने आपल्या परिवारातील एका किन्नराला खूण केली. रत्नजडित पंखांनी सुशोभित असणारा तो किन्नर पुढे आल्यावर कल्याणकीर्तीने त्याला भीमकापुढे उभे केले.

✠ ✠ ✠

## २०

## भाटाला रुक्मिणी दिसते

तेव्हा भीमकाने कल्याणकीर्तीचा आणखी गौरव करून त्याला आपल्या जवळ बोलाविले आणि आपल्या शेजारीच रत्नाच्या आसनावर बसविले. तेथे बसल्यावर एकाएकी त्या भाटाची नजर राजामागे जवळच असलेल्या रुक्मिणीवर पडली. नुकत्याच वयात येणाऱ्या आणि तारुण्याने मुसमुसलेल्या ठेंगण्या ठुसक्या रुक्मिणीचे दर्शन त्या भाटाला झाले तेव्हा क्षणभर त्याला वाटले की या लावण्यसुंदरीची चांदण्यासारखी

आल्हादकारी प्रभा तीनही लोकांत भरून उरावी अशी आहे. हा विचार मनात येताच तो म्हणाला,

'अरे! हे खरोखरच स्त्रीचे रूपसौंदर्य आहे की ही रूपसौंदर्याची ओतलेली मूर्ती आहे? की शंकर आपणाला जाळील या भीतीने मदनाने हे स्त्रीत्वाचे रूप स्वीकारले आहे? यात खरे काय हेच मला कळेनासे झाले आहे. या सौंदर्याचा सत्कार कोणत्या शब्दांनी करावा याचेही भान मला उरलेले नाही. डोळे तर सहजासहजी हिच्यावर जडले ते तिथून हालतच नाहीत. त्यांचा जणू हिच्या सौंदर्याशी वज्रलेप झाला आहे. मी इतकी देशांतरे केली, पण अशा प्रकारचे चेतोहर लावण्य असू शकेल असे कुठे ऐकिलेही नव्हते. हे सौंदर्य मी आजवर पाहिले नव्हते म्हणजे मी सृष्टीत काहीच पाहिले नव्हते असे नाही काय? रूप आणि गुण यांनी रुक्मिणीला तोलून दिसेल असे सौंदर्य तीनही लोक धुंडिले तरी दिसणे शक्य नाही. मला तर हिची लक्षणे अशी दिसत आहेत की ही एका आदिपुरुष श्रीकृष्णालाच बायको शोभून दिसावी. हिचे रूप आणि तारुण्य ऊतू जात आहे. पण अजून हिचा विवाह झालेला नाही. साहजिकच आहे. त्रिभुवनातील सारेच राजे हिच्या तुलनेने हिणकस आहेत. हिचा एक एक अवयव पाहून जो आश्चर्याने स्तंभित होऊन जागच्या जागी थांबत नाही असा कोणी असणे शक्य आहे काय? ही ज्याला माळ घालील असा श्रेष्ठ पुरुष या तीनही लोकांत कोण बरे आहे? विद्याधरी-सारख्या सुंदर अशा या राजकन्येला पृथ्वीवरील राजे योग्यच नाहीत. मला नवल वाटत आहे. श्रीकृष्ण परमात्मा हिचा स्वीकार करील असा काही संभव आहे काय? त्याने हिला वरिले तर मात्र हिचे अहोभाग्य ठरेल.'

भाटाने केलेले हे रुक्मिणीच्या रूपाचे कौतुक पाहून राजाने त्याचा आणखी सत्कार केला. रुक्मिणीचे रूप पाहून कल्याणकीर्तीला वाटलेले आश्चर्य त्या अपूर्व सत्काराने दुणावले. तो म्हणाला,

'राजा तुझ्यासारखा दुसरा सर्वसमर्थ राजा मी तरी पाहिलेला नाही.'

✠ ✠ ✠

२१

## राजाचा प्रश्न

मग भीमकाने त्या श्रेष्ठ भाटाचा आणखीही खास पाहुणचार केला. त्याला वस्त्रे-प्रावरणे देऊन त्याचा सत्कार केला. शत्रुराज्यातून जिंकून घेतलेले खानदेश आणि

बुलढाणा हे दोन प्रांत त्याच्या कायम भोगवट्यासाठी त्याला दान केले. आणि नंतर तो विशेष आपुलकीने त्या भाटाला म्हणाला,

' तुमची बायकामुलं सुखी आहेत ना ? तुम्ही पुष्कळच दिवसांनी या भागात आला आहात. या वेळी तुम्ही कुठच्या देशाला जाऊन आलात ? वाटेत कोणकोणते भूभाग पाहिलेत ? तुमच्या परिवारांतून रत्नजडित पंख असणाऱ्या त्या माणसाला तुम्ही पुढे बोलावले तो कोण आहे ? तुम्ही सारखे फिरत असता आणि पुष्कळ देश पहाता हे आम्हाला माहीत आहे. तुमच्या या प्रवासात तुम्ही कोणत्या देशाचे कोणते राजपुरुष पाहिले आहेत ? '

✠ ✠ ✠

## २२

## भाटाचे उत्तर

कल्याणकीर्ती भाट हा मोठा सुज्ञ मनुष्य होता. राजाने जरी पुष्कळ प्रश्न विचारले होते तरी त्याच्या मनात काय होते हे त्याने ओळखले. आपल्या मुलीला अनुरूप वर कोण हेच राजा आडवळणाने विचारीत आहे हे ओळखून तो म्हणाला,

' चक्रवर्ती भीमराजा, मी ही सप्तद्वीपांत विस्तारलेली सर्व पृथ्वी पाहिली आहे. तेथील सर्व राजेही मी पाहिले आहेत. हा पाखरासारखा पंखधर मनुष्य कोण असे तू विचारलेस. त्याचे आख्यान सांगावयाचे म्हणजे जरा विचित्रच आहे. पण तरीही सांगतो. ऐक. तुला सुप्रसिद्ध मधुवन ऐकून माहीत असेल. हा पंखधर मनुष्य म्हणजे त्या मधुवनात वेदाध्ययन करणारा वेदघोष नावाचा ऋषी आहे. या ऋषीने रंभेच्या प्रीतीचा अव्हेर केला म्हणून तिने याला शाप देऊन पंखधर किन्नर बनविले आहे. याने तीनही लोकांचा प्रवास केला आहे. हा अतिशय चतुर असून याने आपल्या बुद्धीने देवांनाही मोहून टाकले आहे. रंभेने याला शापाबरोबर उःशापही दिला आहे. अंबिका देवीच्या देवळात जेव्हा तुझी कन्या रुक्मिणी कृष्णमुरारीला माळ घालील तेव्हाच याचे पंख गळून पडणार आहेत. मधुवनात हा मला सुदैवानेच भेटला आहे. आपल्या गुरूच्या कृपेने मोठमोठ्या राजसभांतून हा मोठी मान्यता पावला आहे. मलाही याने वाणीवर प्रभुत्व ठेवणारा मंत्र दिलेला आहे. याची स्वतःची वाणी अशी रसवती आहे की आलापाची देवता सरस्वतीही याच्यापुढे पुरी पडत नाही. हा गाऊ लागला की याच्या सुरांपुढे

गंधर्वांचेही तेज पडत नाही. पाताळलोकातील कंबळ आणि अश्वतर हे मोठे विश्वविख्यात गायक मानले जातात. पण त्यांचीही ऐट याच्यापुढे चालत नाही. नारद आणि तुंबरू हे देवांचे गायक. पण याच्या गायनात जे आरोह-अवरोह आणि स्वरांचे समूह आहेत ते त्यांच्याही गाण्यात नाहीत. हा गाऊ लागला की नादलहरींची जणू महानदीच बनते आणि ती दोन्ही तट ओलांडून दुथडी वाहते. हा बोलताना ब्रह्मदेवालाही भीत नाही. खणखणीत वाणीचे अस्सल नाणेच जणू याला लाभलेले आहे. या भूगोलाच्या पिंजऱ्यात याच्यासारखे दुसरे शहाणे पाखरू नाही. पक्ष्याचाही विचार केला तर हा गरुडापेक्षाही उठून दिसतो. ब्रह्मदेवाच्या हंसाला तर हा असंस्कृत म्हणून हसत असतो. याचे वर्णन करू तरी किती ? एकच गोष्ट सांगतो. पृथ्वीवरील सर्व राजे जर विचारात घेतले तर त्यापेक्षा किंबहुना स्वर्गीच्या देवांपेक्षाही द्वारकानाथ श्रीकृष्ण हा अधिक श्रेष्ठ आहे. आणि या किन्नराने नुकतेच त्या कृष्णालाही आपल्या गुणाने प्रसन्न करून घेतलेले आहे.'

✠ ✠ ✠

२३

## किन्नराविषयी सभासदांचे तर्क

कल्याणकीर्ती असे बोलत होता. ज्याच्याविषयी हे बोलणे चालले होते तो किन्नर मात्र गंभीरपणे स्तब्धच राहिला होता. त्याचे वर्णन चालू असता सभासद त्याच्याकडे पाहत होते व आपसात म्हणत होते,

'हा किन्नर तर नवरत्नांचा घडलेला दिसत आहे. हा सजीव कोठून असणार ?'

'हा पोवळ्याचा घडलेला असावा आणि याने रत्नांचा सुंदर वेष केलेला असावा. किंवा मला वाटते रत्नकमळाचा गाभाच पंख फुटून स्वयंभूपणे बाहेर पडला असावा आणि त्याचेच हे किन्नर रूप असावे.'

'छे छे ! मला वाटते संध्येचा साराच्या सारा लालिमा एकत्र करून याचे अंग घडविले आहे. याच्या भूदंडांना हिऱ्याची भूषणे जोडलेली आहेत. याच्या सर्व अंगावर श्रीकृष्णाच्या नाममुद्रेतील ठसे उमटलेले आहेत.'

'याचे सौंदर्य काही आगळेच बुवा. याचे कोपरापासून पुढचे हात आणि तळ-

पाय सोन्याचेच घडविले आहेत असे वाटते. याच्या डोळ्यांत निळ्या कमळाची आणि ओठांवर लाल माणकाची छटा दिसत आहे.'

'अहाहा काय या किन्नराचे अलौकिक रूप तरी! आपल्या सौंदर्याने हा या सभेतील सर्व पुरुषांना जणू आव्हानच देत आहे.'

अशा प्रकारे त्या सभेत किन्नराविषयी चर्चा रंगली होती.

✠ ✠ ✠

२४

## किन्नर उभा रहातो

तेवढ्यात कल्याणकीर्तीचे बोलणे संपले आणि भीष्मकाने त्या किन्नराकडे अपेक्षेने पाहिले. तेव्हा किन्नराने आपले गांभीर्य सोडून दिले. अंतःकरणात एकदा श्रीकृष्णाचे मनोमन स्मरण करून त्याने संगीतात सहकार देणाऱ्या आपल्या साथीदारांकडे दृष्टिक्षेप टाकला. मग त्याने आपले पंख एकदा फडफडावले आणि तो उभा राहिला. सर्व सभेचे लक्ष त्याच्याकडे आधीच वेधले होते.

किन्नर उभा राहिल्यावर कल्याणकीर्ती म्हणाला,

'विदर्भराज भीष्मका, आता या किन्नराची संगीतातील तयारी पाहा.'

तोवर गायनासाठी सज्ज होणाऱ्या किन्नराचे संपूर्ण दर्शन सभासदांना होत होते. त्याने आपल्या मस्तकावर पाचेचा मुकुट घातला होता. त्याच्या कानांत झुबकेदार कुंडले होती गळयात कृष्णाकडून प्रसाद म्हणून मिळालेली माळ होती. तिच्याखाली पांढऱ्या स्वच्छ यज्ञोपवीताचा जुडगा होता. त्याच्या हातात मोत्यांचा एकसर होता त्यामागे कडे होते. दोन रत्नजडित अंगठ्या त्याच्या बोटात होत्या. त्याच्या पायात जाड तोडा होता. त्यावर त्याने संगीतात आजवर जिंकिलेल्या पराभूत प्रतिस्पर्ध्यांची नावनिशीवार चित्रे काढली होती. त्याचे सर्व अंगच रत्नाप्रमाणे शोभायमान होते. त्याच्या ललाटावर चंदनाचा उभा टिळा होता. राजाने सन्मानाने दिलेल्या शेल्याचा पदर त्याने पांघरला होता. त्याच्या हातात हरिचंदनाच्या लाकडापासून बनविलेली वीणा होती. तिच्या दोन्ही बाजूंला माणिकाचा जडाव होता. भोपळ्याच्या खालच्या बाजूला ओतीव चंद्रकलेप्रमाणे शोभणारे तारांचे उंच टेकण होते.

✠ ✠ ✠

२५

## किन्नराचे गायन

किन्नर उठून राजापुढे उभा राहिला आणि त्याने त्याच्यामागे सूर धरणाऱ्या सवंगड्यांना खूण केली. प्रथम त्याने हात वर करण्याची आशीर्वादपर क्रिया केली. व कल्याणवचन गाइले. ते गायन अतिशय मनोगम्य होते. राजा संतुष्ट व्हावा हा हेतू त्या गायनामागे होता. तो परिपूर्ण झाला. राजा त्याचा संतोष व्यक्त करीत आहे तोच किन्नराने त्याला आणखी आश्चर्यात टाकिले. आशीर्वादपर अर्थाने ओथंबलेले नवे गीत तेथल्या तेथे रचून त्याने म्हटले. तोवर किन्नराला साथ करणारे कल्याणकीर्तीच्या परिवारातील बालसाथीदार तयार होऊन त्याच्या मागे उभे राहिले होते. या साऱ्या मुलांचे डोळे एकजात सुंदर होते. त्यांचे रूपही मोठे लोभसवाणे होते. हरिणीची सुंदर पाडसे गोंडस दिसावी तशी ती मुले दिसत होती. त्यातील कुणाच्या हातात वीणा होती. कुणाच्या हातात मृदुंग होते. कुणाच्या हातात शास्त्रशुद्ध सूर काढू शकणारी सुरेल वाद्ये होती. त्या मुलांनी प्रथम सात सुरांची सुरावट आपल्या कंठातून काढून दाखविली आणि लागोपाठ हुबेहूब तसेच स्वर त्यांनी त्यांच्या वाद्यांतून काढले. मग मृदुंगकार आपल्या बोलांची अंगे-उपांगे दाखवू लागले. तंतुवाद्यकार आपल्या वाद्याच्या खुंट्या फिरवून सूर जुळवून घेऊ लागले. सूर धरणारे, ताल धरणारे, वेणू वाजविणारे सारे एका सुरात येऊ लागले. हळूहळू गळयातून निघणारा सूर आणि वाद्यातून निघणारा सूर एकमेकांत मिसळले. एकमेकांत लपेटून निघणाऱ्या सात सुरांच्या आलापांचा जणू गोफ बनू लागला. किन्नराने आपला आवाज त्यात मिसळला आणि त्याच्या कंठातून निघणाऱ्या गमकांच्या लहरी हळूहळू अस्मानात उंचावू लागल्या.

* * *

२६

## गायनाचा समारोह

नंतर किन्नराने निषाद लावला. वीणांच्या तारांवरून त्याला तोलामोलाची साथ मिळाली. शास्त्रसंमत अशा कालमर्यादेत त्याने जी स्वरसाधना प्रकट केली तिची थोरवी

आगळीच होती. त्यानंतर त्याने स्वर्गात गाइल्या जाणाऱ्या शुद्ध संगीताचे स्वरूप उलगडावयास प्रारंभ केला. असले शुद्ध संगीत स्वर्गात गाइले जाते हे आजवर मृत्युलोकाला आणि पाताळलोकाला फक्त ऐकूनच माहिती होते. आता ते स्वर्गीय संगीत, किन्नर, भीमकाच्या सभेत मूर्त करीत होता. भरत मुनीने खरोखरच स्वर्गासाठी असले संगीत रचलेले होते— त्याचे अस्तित्व ही केवळ वदंता नव्हती-याची खात्री तो किन्नर मृत्युलोकात पटवून देत होता. शुद्ध संगीताचा विस्तार होतच होता. ताल, रचना, मर्यादित सुरांचे राग, संपूर्ण सात सुरांचे राग, आरोह या साऱ्या अंगांचे निर्दोष प्रदर्शन होत होते.

स्वर्गातील शुद्ध संगीताचे गायन संपल्यावर किन्नराने संकीर्ण संगीताच्या गायनाला आरंभ केला. संकीर्ण संगीत हे पाताळातील नाग लोकांनी वाढविले आणि जोपासले होते. कंबळ आणि अश्वतर या पाताळलोकीच्या गायकांनी याच संगीताच्या संजीवनीने मदालसेला नवजीवन दिलेले होते.

संकीर्ण संगीतानंतर किन्नराने मृत्युलोकात गाइले जाणारे साळांग संगीत अतिशय कौशल्याने गावयास आरंभ केला. त्याने प्रथम रागांची सुरावट गाऊन दाखविली. नंतर शास्त्रीय पद्धतीने त्या रागांचा आविष्कार केला. पुढे त्या रागांचे उपभेद गाऊन दाखविले. नंतर नाना देशांत प्रचलित असलेली त्या रागांची रूपे गाऊन शेवटी मराठी भाषेत लोकमान्य असलेले रागांचे स्वरूप प्रकट केले. एकतालापासून ध्रुवतालापर्यंतचे सात ताल, भारतात त्या वेळी चालू असलेल्या चार परंपरा, रचनेचे पन्नास प्रकार, स्थायी—आरोही— अवरोही या तीन पद्धती, ध्रुपदाच्या दोन तऱ्हा; चार पद्धतीचे अभंग, अशा अनेक प्रकारांत संगीताचा हा समारोह रंगला. छाती, गळा, मस्तक, जिभेचे मूळ, दात नाक, ओठ आणि टाळू या आठ इंद्रियांच्या विशेष सहकाराने होणारे आठ प्रकारचे स्वरभेद त्याने प्रकट केले.

साळांग संगीत, संकीर्ण संगीत आणि शुद्ध संगीत यांच्या या त्रिमार्गी गायनातून त्याने संगीताचा कीर्तिध्वज उंच उभविला. संगीताच्या यशाचा पवाडाच जणू तेव्हा दुमदुमू लागला. नंतर किन्नराने एक सुंदर गत म्हणून शेवटी नुसत्या अस्ताईचे सूर घोळवायला सुरुवात केली. मागील साथकार सुराचे साम्राज्य निर्मीत होते आणि त्या सुरात किन्नराचे आलाप लपेटून जात होते. असे वाटत होते की आकाश संध्यारंगांनी रंगलेले असावे आणि त्या पार्श्वभूमीवर केशरकुंकुमी रंगाचा सुंदर पतंग विहरत असावा.

संगीताची ही मैफल अशा प्रकारे धुंदावली असतानाच भीमकाने जे प्रश्न कल्याणकीर्तीला विचारले होते त्यांची उत्तरे संगीतातूनच द्यावयास त्या किन्नराने आरंभ केला. नरेंद्र कवी आता ओव्यांच्या रूपाने तीच उत्तरे इथे सांगत आहे. त्याकडे वाचकांनी लक्ष द्यावे. डाळिंबाचे फळ जसे सर्वांशाने रसमय आणि सौंदर्यसुभग असते तसा हा रुक्मिणीस्वयंवर ग्रंथही सामग्र्याने रसमय आणि रमणीय आहेच. शिवाय डाळिंबाची

प्रत्येक बीही जशी सुंदर आणि रसपूर्ण असते तसेच या ग्रंथातील प्रत्येक अक्षर न् अक्षर रसाने भरलेले आहे. रसिकांनी डाळिंबाच्या दाण्याप्रमाणे शोभणाऱ्या एका एका ओवीचा रसास्वाद आता घ्यावा.

✠ ✠ ✠

२७

## रुक्मिणीचे वर्णन

नंतर त्या किन्नराने श्री राग आणि देशांक राग यांची सुरावट गाइली आणि रुक्मिणीकडे पहात पहात तो भीमकाला म्हणाला,

‘ राजेंद्रा, ऐक. ब्रह्मशक्तीची माया या सृष्टीत प्रकटते. त्या मायेचे सौंदर्य अवर्णनीयच आहे. परंतु ते सौंदर्य नैसर्गिक आणि असंस्कृत अवस्थेत असल्याने त्याची तुलना या रुक्मिणीच्या रूपाशी होऊ शकत नाही. जातिवंत रूपवती म्हणून शंकराची बायको पार्वती मोठी वाखाणिली जाते. परंतु ती तापट स्वभावाची असल्याने तिची तुलना रुक्मिणीशी होऊ शकत नाही. विष्णूची बायको लक्ष्मी बहुतेक स्त्रियांत सुंदर आहे असे म्हणतात. पण मला तर ही सुलोचना तिच्याहूनही अधिक रूपवती वाटते. चातुरी आणि गुणवत्ता यांचा विचार करता ही रतीलाही मागे सारीत आहे. इंद्राणीचे रूप अलौकिक. एका डोळ्याने पाहून ते संपत नाही म्हणून इंद्राने सहस्र डोळ्यांची साधना केली. परंतु इंद्राणीचीही तुलना रुक्मिणीशी होऊ शकत नाही. कारण ती बाजारात बसलेली आहे. शंभर यज्ञांचे मोल द्यावे आणि कोणीही तिचा उपभोग घ्यावा. अक्षराची स्वामिनी शारदा. लोकांना प्रत्यक्ष प्रीतिभावनेचा विसर पाडावयास लावावा असे सौंदर्य साहित्यातील अक्षररचनेचे. त्या दृष्टीने शारदा ही मदनाचा गर्वच हरण करणारी.. पण रुक्मिणी रसाळ कवितेचाही विसर पाडावयास लावणारी असल्याने तिने शारदेलाही जिंकिले आहे. नळाची दमयंती ही मोठी रूपवती मानली जाते. तिच्यावर भुलून नळाचे रूप घेणाऱ्या देवांना तिने कस्पटाप्रमाणे लेखले होते. परंतु दुर्दिन आले तेव्हा नळानेच तिचा त्याग केल्याने ती मोठ्या अपेशाची धनीण झाली. जो हिचा होईल त्या पतीला नेहमी मुठीत ठेवण्यास समर्थ असणारी ही तुझी लेक हिच्याशी दमयंतीचीही तुलना होऊ शकत नाही.

✠ ✠ ✠

२८

## रुक्मिणीला योग्य वर देवांत नाही

‘ रुक्मिणीचे हे सर्वांगीण सौंदर्य पाहिल्यावर मी आता तिला शोभेसा वर म्हणून देवांच्या रूपाचे वर्णन करण्यात अर्थ नाही. कुणाला चार हात, कुणाला तीन डोळे, कुणाला सोंड, तर कुणाला शेपूट असलेले हे कुलक्षणी देव डाकिणीसारखे विरूप आहेत. कुणाला ब्रह्मदेवासारखी प्रत्येक दिशेला तोंडे आहेत, तर कुणाला विष्णूसारखी दोन्ही बाजूंना हाताची शिपतरे आहेत. यांचे डोळे मिटत नाहीत म्हणून हे सदाचे भूतबाधा झाल्यासारखे झपाटलेले दिसतात. हे देव सदा वखवखलेले असतात. यज्ञकुंडातील आगीत तोंडे खुपसून हे खातात. आज कुठे यज्ञ आहे ? धर्मकाजासाठी आज कुणाचे घर सारवले जात आहे याचा वास घेत हे फिरत असतात. उंबऱ्यावर फेकून दिलेल्या शितांचे वळी हे आशेने झेपावून खातात. गवत, दर्भ, समिधा यांनी यांची तोंडे नेहमी खरखटलेली असतात. तिळातुपाने यांची अंगे बरबटलेली असतात. देवावर नजर पडताच जिथे ओकारी येते तेथे रतिसौख्याच्या उपभोगासाठी त्यांचा विचार करण्यात शहाणपणा नाही. जे देव पुजाऱ्यांना, भटांना चाळवून पुढे करतात; स्वतःचे पोट जाळण्यासाठी बोकड मारवीत असतात; एवढेच नव्हे, जेव्हा नरमेधासारखा मोठा यज्ञ असेल तेव्हा माणूस-पशू हा भेद न करता माणसेही मारवून खातात. त्या राक्षसी देवांना देव तरी काय म्हणून म्हणावे ? या असल्या देवांपेक्षा माणूस शतपटीने अधिक बरे. ही गोष्ट सिद्धही झालेली आहे. किती तरी देवकन्यांनी, अप्सरांनी; कामभोग भोगण्यासाठी देवांची संगत सोडून माणसांना वरले आहे. पण या उलट इथली एक तरी माणूस स्त्री देवांच्या घराच्या वाऱ्याला तरी उभी राहिली आहे काय ? देवाकडे जावयाचा मार्ग एकच. मृत्यू. अशा सुंदर नवरीला देवांत नवरा पाहून तिने जिवंतपणीच सासर म्हणून स्वर्गात जावे असे म्हणणे हे मोठे पाप आहे. मी तरी या पापात शिरणार नाही. ’

* * *

२९

## पाताळातही रुक्मिणीला वर नाही

' आता पाताळासंबंधी बोलावयाचे तर तेथील नागलोक हे विषारी आहेत. शिवाय बेंबीच्याखाली जे अवयव असावयास हवेत, ते त्यांना नाहीत. त्यांच्या डोक्यावर फणांची झुबाडे वाढलेली आहेत. त्यांच्या श्वासाबरोबर तोंडातून आगीच्या ज्वाळा उडत असतात. त्यांना कान नाहीत. डोळ्यांनीच पहावेही लागते व ऐकावेही लागते. त्यांच्या डोळ्याला डोळा भिडताच जिथे वीष भिनते तिथे त्यांच्याबरोबर रतिसुखाचा आस्वाद तरी कसा घ्यावयाचा ? विषाने सर्वांगी काळे पडलेले हे नाग काय राजकन्येशेजारी तिच्या शयनावर बसावयास लायक आहेत ? पाताळीचे हे नाग लोक आणि विकृत रतिलीलांत रस घेणारे देव यांचा विचार करता या मर्त्यलोकीचे मानव हेच अधिक श्रेष्ठ होत. '

✠ ✠ ✠

३०

## सप्त द्वीपातील वरांचा विचार

एवढे सांगून झाल्यावर किन्नराने धनाश्री रागाचे आलाप घ्यावयास सुरुवात केली आणि तो म्हणाला,

' राजा, आता मर्त्यलोकीच्या राजांची माहिती सांगतो. लक्ष देऊन ऐक. यातील भारतवर्ष सोडून इतर देशातील जे राजे आहेत ते ताडामाडासारखे अगडबंब असल्याने त्यांच्यासंबंधी काही माहिती मी द्यावी अथवा तू ऐकावी असे नाही. '

✠ ✠ ✠

# ३१

## भारतातील राजे : उत्तरेकडील

' राजा, भारताचा विस्तार सव्वा लक्षाचा आहे. या बाहेर दक्षिणेला सुमारे सोळा हजारांचा विस्तार असून उत्तरेला चौऱ्याऐंशी हजार विस्ताराची स्वर्गभूमी आहे. भारताच्या वस्तीच्या शेवटी व स्वर्गाच्या उंबरठ्याच्या आधी गंधर्वांची वस्ती आहे. तेथेच किन्नर आणि विद्याधर यांचीही प्रकाशमान नगरे आणि राज्ये आहेत. येथील नागरिक मोठे वभवसंपन्न आहेत. त्यांची कांतीही तितिर पक्ष्याप्रमाणे तेजस्वी आणि लालसर आहे. पण त्यांच्या देहाचे ठानमाण माणसासारखे नसल्याने ते रुक्मिणीला वर म्हणून अनुरूप नाहीत. त्यामुळे मी आता माणसांचे जे जे राजे आहेत त्यांची माहिती तुला सांगतो. एकदम उत्तरेला मानस सरोवराचे राज्य आहे. तेथे गीतशंकर नावाचा राजा राज्य करतो. आसमंतातील गंधर्वांच्या सुरूप कन्या याच्यावर भाळून जीव ओवाळत असतात. पण त्या साऱ्यांनाच त्याच्या सहवासाची संधी मिळते असे नाही. यानंतर हूण लोकांचा हाटक देश आहे. पुरुषोत्तमाचा मुलगा गुह्यक हा त्यांचा राजा आहे. हा मोठा पराक्रमी आहे. देवांच्या भाटांचे थवेच्या थवे याच्या कृपाकटाक्षासाठी याच्यापुढे खोळंबून उभे रहातात. गांधाराच्या उत्तरेस कुंभोज देश आहे. तेथे तूर्त दरद नावाचा राजा राज्य करतो. रिख बेटावरील घोड्यांचा संग्रह करण्याचा याला मोठा नाद आहे. त्याने आपल्या या घोड्यांची पोटे पोपटी रंगाने रंगविली आहेत. हे घोडे अग्निज्वाळेप्रमाणे तेजस्वी आहेत व ते उडू लागले की जणू पंखांनीच उडत आहेत असा भास होतो.

' त्या अलीकडे झेलम नदीच्या तीरावर सिंहपुरी नावाचे राज्य आहे. तेथे चित्रायुध राजा राज्य करतो. कोसल देशाचा राजा दधीच हाही मोठा प्रसिद्ध आहे. हे दोन्ही राजे मोठे वीर असून ते समरांगणात उतरले म्हणजे मृत्यूलाही भीत नाहीत. सतलज नदीच्या काठी त्रिगर्तदेश आहे. येथील राजा सुधन्वा याच्या पराक्रमामुळे यमही त्याला भितो. गढवालच्या परिसरात उत्तरकुरू देश आहे. तेथील राजा उत्तरकुमर याच्या पराक्रमाला पृथ्वीत दुसरी तोड नाही. याची समशेर ही गंगेपेक्षाही मोठी पवित्र आहे. कारण गंगा नदीच्या धारेवर जो पडतो तो बुडून मरतो आणि तळाशी जातो परंतु याच्या तरवारीच्या धारेवर जो पडतो तो निश्चयाने मरून वीरगती पावतो व स्वर्गाला वर जातो. यानंतर काश्मीर देश. तेथे नादमूर्ती नावाचा राजा आहे. हा चक्रवर्ती राजा संगीताचा मोठा भोक्ता आहे. रुक्मिणीची कीर्ती त्याने ऐकिली आहे. तिला तिची ओढ लागलेली आहे. तिला प्रत्यक्ष पाहण्यासाठी त्याची दासी नुकतीच गुप्तपणे येऊन गेलेली आहे. ब्रह्मपुत्रा नदीच्या उगमाजवळ देशमंडळ देश आहे. त्याचा राजा लोहित आहे. पंचनद्यांच्या परिसरातील दिव्यप्रस्थ नगरीचा राजा सेनाधीप म्हणून आहे. हे सारे

एवढे पराक्रमी आहेत की एकदा त्यांच्या हत्याराचा स्फुलिंग पडला की त्यातून प्रलयाग्नि-सारखा आकान्त होतोच होतो.

'हिमालयाच्या उपत्यकेत पुष्कळ डोंगरी राजे आहेत. हिमालयातही अनेक सुंदर राजे आहेत. हे सारे एवढे कडवे योद्धे आहेत की अकराच्या अकरा रुद्र एक झाले तरी हे त्यांच्याशी एकएकट्याने लढू शकतात. यांनी आपल्या पराक्रमाने तेथील सारे सिंह मारून टाकले असल्याने तेथील हत्ती निर्घोर झालेले आहेत. सरोवरात विहार करताना ते हत्ती त्यांच्या तोंडातून जे पाण्याचे फवारे उडवीत असतात ते आकाशापर्यंत जातात आणि त्यांचे पाणी पिऊन ढग जेव्हा तृप्तीच्या ढेकरा गर्जतात तेव्हाच दशदिशांत पाऊस पडतो. भौमासुराचा पुत्र भगदंत हाही मोठा पराक्रमी राजा आहे. त्याच्या तरवारीची गाठ ज्याच्याशी पडली त्याला मृत्यू आलाच हे ठरलेले असल्याने इंद्र जेव्हा जेव्हा सिंहासनाकडे दुर्लक्ष करून स्त्रीविलासात रंगतो तेव्हा तेव्हा तो सिंहासनाच्या स्थैर्याबाबत भगदंताच्या मैत्रीवरच विसंबतो. हिमालयाच्या परिसरातील सप्तमंडळ राज्यात जे क्षत्रिय आहेत त्यांच्या सदोदित परजलेल्या शस्त्राच्या धारेवर सूर्यकिरण झळकू लागले म्हणजे असे वाटते की त्यांच्या शस्त्रांना भिऊन सूर्यच थरथरा कापत आहे.'

'विंध्याच्या परिसरात विंध्यराज राज्य करीत आहे. त्याचे रत्नभांडार इतके समृद्ध आहे की जणू काय त्याला भिऊन पृथ्वीने आपल्या पोटातील रत्नभांडार आपणहून त्याला करभार म्हणून दिलेले आहे असे वाटते. शिवाय याच पर्वतीय प्रदेशात वाल्मीक राजाही राज्य करीत आहे. नेपाळमधे कीर्तिदेव राजा आहे. हे दोघेही मल्लविद्येचे भोक्ते असून परस्परांच्या संगतीत तालीम करण्यासाठी ते जो आखाडा वापरतात त्यात माती-ऐवजी कस्तुरी पसरलेली आहे. यापलीकडे म्लेंच्छमंडळ आहे. तेथे कालयवन राजा राज्य करतो. दक्षिण दिशेचा लोकपाल यमराज याच्याही सत्तेवर कालयवनाने दबाव ठेविलेला आहे. यापुढे तुरकाण देश आहे. तेथे वज्रादी नावाचा राजा राज्य करतो. त्याचे घोडदळ समुद्राप्रमाणे प्रचंड असून ते त्याचे मोठेच वैभव आहे. या घोडदळामुळे तो जे पराक्रम करीत असतो त्याच्या उष्णतेमुळे स्वर्गातील देवांची खड्गे वितळून भूमीवर कोसळतात. त्याच आयत्या तयार मिळालेल्या लोखंडातून हा वज्रादी राजा आपल्या घोड्यांच्या खुरांसाठी नाल बनवितो. शिवाय एक मोठा तलावही त्याने त्याच्या राज्यात या लोखं-डाच्या साहाय्याने बांधून काढला आहे. कारक देशाचा राजा जो दंतवक्त्र म्हणून आहे त्याचा पराक्रम काय वर्णू? त्याने अष्ट दिक्पालांना सुद्धा त्याच्या बळाचा मोठेपणा पटविला आहे. त्याचा कुणावर क्रोध झाला की तो यमाचा सवंगडी असल्याप्रमाणे भयानक होतो. आपल्या या सामर्थ्याच्या बळावरच तो स्वतःच्या राज्यात इंद्रासारखे वैभव भोगत असतो.'

'चंबळा नदीच्या काठावरील रश्मिजाळ देशामध्ये कुंतिभोज राजा राज्य करतो. त्याचा रथ सूर्यासारखा तेजस्वी आहे. नर्मदेच्या तीरावरील महिष्मती नगरीत हैहय कुळातील

कार्तवीर्य अर्जुनाचा वंशज महानिळ राजा राज्य करीत आहे. हा राजा अभिनंदन दत्तात्रेयाचा मोठा भक्त आहे. तो आपल्या धनुर्बाणाच्या जोरावर नंदनवनावर स्वारी करून तेथील स्वर्गीय फुले जिंकून आणतो आणि त्यांनी दत्ताची पूजा करतो. नर्मदेच्या उगमाजवळ त्रिपूर राज्य आहे. तेथे प्रतापलोचन राजा राज्य करतो. त्याने आपल्या बाहुबळाने सारी ईशान्य दिशा जिंकून घेतली आहे. धृतराष्ट्राचा पुत्र दुर्योधन गंगातीरी हस्तिनापुरात आहे. साऱ्या विलासी लोकांना तो त्याच्या रूपवैभवाने लाजवीत असतो. रणदेवता जेव्हा मांसासाठी भांडत असतात तेव्हा तो आपल्या पराक्रमाने मांसाची एवढी रेलचेल करतो की रणदेवतांना वाट्यासाठी भांडावे लागत नाही. माणसे, सिंह, हत्ती, घोडे या साऱ्यांच्या मांसाचा लगदा त्याने केला म्हणजे कुठले मांस कुणाचे हे ओळखणेही अशक्य व्हावे असा प्रचंड संहार दुर्योधन युद्धात करतो. उज्जयनीचा राजा विंदानुविंद याला रत्नाचा शौक आहे. त्याने जणू समुद्राची मुळापासून झडती घेऊन रत्ने जमविली आहेत. आणि अखंड रत्नांचा एक हार बनवून तो मोठ्या कौतुकाने त्याचे आराध्यदैवत जो महाकाळ त्याला अर्पण केला आहे.'

✣ ✣ ✣

## ३२

## पूर्वेचे राजे

'सोमवंश आणि सूर्यवंश यांचे जे राजे उत्तरेला राज्य करतात त्यांची माहिती आता संपली. इथून पुढे मी पूर्वेचे आणि ईशान्येचे राजे सांगतो ते ऐक—'

म्हणून किन्नराने मल्हार राग आळविण्यास सुरुवात केली. आणि तो भीमकाला म्हणाला,

'आता मी समोरील पूर्व दिशेच्या राजांचे यथासांग वर्णन करतो. लक्षपूर्वक ऐक. कैलासाच्या अलीकडे ईशान्येस वज्रकेतू क्षत्रिय राजा आहे. ज्ञानभैरव नावाचा या राजाचा प्रधान असून तो स्वतःच्या राजाला सोडून इतर कुणाला ओळखत नाही. कैलासाच्या अलीकडील खोऱ्यात शोणितपूर नगरी आहे. शंकराचा पराक्रमी भक्त बाणासुर याची ही राजधानी. सहस्रकर अशा सूर्याशीही या बाणाने पृथ्वीवर राहूनच चढाओढ केली होती. इथे आज बाणाचा पराक्रमी वंशज राज्य करीत आहे. गंगेच्या मुखाजवळील सागरसंगम राज्यात अतिक्षेत्राचे राज्य आहे. कांतिमंडळात राजपुत्र नावाचा राजा आहे. त्याने

असे म्हटल्यावर त्याने यमळ आणि अर्जुन ही दोन झाडे उपटली असे म्हणण्यात विशेष मोठेपणा नाही. तो नुसती जांभई देतानाच जिथे ब्रह्मांड गिळू शकतो तिथे त्याने बकासुर आणि कागासुर मारले हे सांगण्यात मोठीशी प्रतिष्ठा नाही. आणि जिथे अज्ञानासारख्या महान शत्रूचा त्याने नाश केला आहे, तिथे त्याने अघासुर आणि तृणावर्त यांचा पराभव केला याचा उच्चार करण्यात मोठासा गौरव नाही. यमुनेच्या डोहात कालिया सर्पाचे थोबाड फोडून जेव्हा कृष्णाने त्याला वेसण घातली तेव्हा त्याने जणू मृत्यूच्याच पाठीवर थाप मारावी अशा तोडीचा पराक्रम केला. गोकुळातील गाईवासरे लपविण्याचा पराक्रम ब्रह्मदेवाने केला तेव्हा एखादा खेळ खेळावा अशा सहजपणाने या कृष्णाने ब्रह्मदेवाच्या नाकावर टिच्चून त्याच्या डोळ्यादेखत मायेने गाईवासरे निर्माण केली आणि त्याला धडा शिकविला. या कृष्णाच्या पराक्रमाची कक्षा उंचावत गेली तेव्हा दिव्यावर पतंग जळावे तसे असुर त्या पराक्रमात जळाले. एवढा मोठा कंस राजा, पण तो उभ्याउभ्या काळीज फाटून मेला. जेथे कृष्णाने प्रत्यक्ष यमावरच स्वारी केली आणि यमाने नेलेला सांदीपनी गुरूचा पुत्र सोडवून आणला तिथे त्याच्या अचाट कृतीचे वर्णन तरी कसे करावयाचे ?

श्रीकृष्णाच्या पराक्रमाचा ताप सातही समुद्रांना सोसेनासा झाला म्हणून तर ते त्याला शरण गेलेले आहेत आणि त्यांनी आपल्या उदरातून सोन्याची द्वारका काढून ती कृष्णाला खंडणी म्हणून दिली आहे. वेदांची चोरी करून शंखासुर सागराच्या तळी लपला तेव्हा अंशमात्र सामर्थ्याने श्रीकृष्णाने एखाद्या माशासारखा सागर धुंडाळला आणि शंखासुराला दंड केला. यमुना नदी मार्गात आडवी आली तेव्हा कृष्णाने नुसत्या पायांच्या स्पर्शाने तिचे दोन तुकडे केले. सागरमंथनात मेरू बुडू लागला असताना कृष्णानेच तो मेरू पर्वत आणि सारी पृथ्वी पाठीवर सांभाळली तिथे गाईंची पोटे भरण्यापुरत्या मूठभर गवताने व्यापलेला टिचभर गोवर्धन पर्वत त्याने चेंडूसारखा सावरला यात विशेष सांगण्याजोगे काही नाही. वराहाच्या रूपाने त्याने सारी पृथ्वी दाताच्या एका टोकावर सावरली होती त्यापुढे गोवर्धन पर्वत उचलणे हा मोठा पराक्रम झाला असे सांगणेच लाजिरवाणे आहे. नाना तऱ्हेची रूपे घेऊन कृष्णाने जे पराक्रम केले आहेत त्यांचे नुसते कीर्तन केले तरी मुक्ती मिळते व परब्रह्माची जोड मिळते असे त्याचे भक्त सांगतात. कृष्णाने केलेली ती सारीच अद्भुत कार्ये मी इथे सांगेन तर आपण आता ज्या गोष्टींचा विचार करीत आहोत तिच्या चिंतनात उगाच खंड पडेल. ( रासक्रीडा वगैरेचे खरे रहस्य रुक्मिणीला कळले नाही तर कदाचित तिचा मनोभंग होईल ) त्यामुळे इतकेच सांगतो की श्रीकृष्णाने आजवर जी दाने दिलेली आहेत त्यांच्या पुरात पृथ्वीवरील सारे राजे त्यांच्या लवाजम्या-सह बुडालेले आहेत. आकाशाच्या पृष्ठभागावर तारकांच्या अक्षरांनी तोच इतिहास लिहिलेला आहे. '

असे म्हणून किन्नर थांबला. त्याच्या गायनातील रसवत्तेने आकाशाची पोकळी

असे म्हटल्यावर त्याने यमळ आणि अर्जुन ही दोन झाडे उपटली असे म्हणण्यात विशेष मोठेपणा नाही. तो नुसती जांभई देतानाच जिथे ब्रह्मांड गिळू शकतो तिथे त्याने बकासुर आणि कागासुर मारले हे सांगण्यात मोठीशी प्रतिष्ठा नाही. आणि जिथे अज्ञानासारख्या महान शत्रूचा त्याने नाश केला आहे, तिथे त्याने अघासुर आणि तृणावर्त यांचा पराभव केला याचा उच्चार करण्यात मोठासा गौरव नाही. यमुनेच्या डोहात कालिया सर्पाचे थोबाड फोडून जेव्हा कृष्णाने त्याला वेसण घातली तेव्हा त्याने जणू मृत्यूच्याच पाठीवर थाप मारावी अशा तोडीचा पराक्रम केला. गोकुळातील गाईवासरे लपविण्याचा पराक्रम ब्रह्मदेवाने केला तेव्हा एखादा खेळ खेळावा अशा सहजपणाने या कृष्णाने ब्रह्मदेवाच्या नाकावर टिच्चून त्याच्या डोळ्यादेखत मायेने गाईवासरे निर्माण केली आणि त्याला धडा शिकविला. या कृष्णाच्या पराक्रमाची कक्षा उंचावत गेली तेव्हा दिव्यावर पतंग जळावे तसे असुर त्या पराक्रमात जळाले. एवढा मोठा कंस राजा, पण तो उभ्याउभ्या काळीज फाटून मेला. जेथे कृष्णाने प्रत्यक्ष यमावरच स्वारी केली आणि यमाने नेलेला सांदीपनी गुरूचा पुत्र सोडवून आणला तिथे त्याच्या अचाट कृतीचे वर्णन तरी कसे करावयाचे ?

श्रीकृष्णाच्या पराक्रमाचा ताप सातही समुद्रांना सोसेनासा झाला म्हणून तर ते त्याला शरण गेलेले आहेत आणि त्यांनी आपल्या उदरातून सोन्याची द्वारका काढून ती कृष्णाला खंडणी म्हणून दिली आहे. वेदांची चोरी करून शंखासुर सागराच्या तळी लपला तेव्हा अंशमात्र सामर्थ्याने श्रीकृष्णाने एखाद्या माशासारखा सागर धुंडाळला आणि शंखासुराला दंड केला. यमुना नदी मार्गात आडवी आली तेव्हा कृष्णाने नुसत्या पायांच्या स्पर्शाने तिचे दोन तुकडे केले. सागरमंथनात मेरू बुडू लागला असताना कृष्णानेच तो मेरू पर्वत आणि सारी पृथ्वी पाठीवर सांभाळली तिथे गाईची पोटे भरण्यापुरत्या मूठभर गवताने व्यापलेला टिचभर गोवर्धन पर्वत त्याने चेंडूसारखा सावरला यात विशेष सांगण्याजोगे काही नाही. वराहाच्या रूपाने त्याने सारी पृथ्वी दाताच्या एका टोकावर सावरली होती त्यापुढे गोवर्धन पर्वत उचलणे हा मोठा पराक्रम झाला असे सांगणेच लाजिरवाणे आहे. नाना तऱ्हेची रूपे घेऊन कृष्णाने जे पराक्रम केले आहेत त्यांचे नुसते कीर्तन केले तरी मुक्ती मिळते व परब्रह्माची जोड मिळते असे त्याचे भक्त सांगतात. कृष्णाने केलेली ती सारीच अद्‌भुत कार्ये मी इथे सांगेन तर आपण आता ज्या गोष्टींचा विचार करीत आहोत तिच्या चिंतनात उगाच खंड पडेल. ( रासक्रीडा वगैरेचे खरे रहस्य रुक्मिणीला कळले नाही तर कदाचित तिचा मनोभंग होईल ) त्यामुळे इतकेच सांगतो की श्रीकृष्णाने आजवर जी दाने दिलेली आहेत त्यांच्या पुरात पृथ्वीवरील सारे राजे त्यांच्या लवाजम्यासह बुडालेले आहेत. आकाशाच्या पृष्ठभागावर तारकांच्या अक्षरांनी तोच इतिहास लिहिलेला आहे. '

असे म्हणून किन्नर थांबला. त्याच्या गायनातील रसवत्तेने आकाशाची पोकळी

विक्रमकेतू आहे. याचे सैन्य अफाट असून त्याची मोजदाद अजून शत्रूच्या हेरांना लागू शकलेली नाही. पांड्य देशात दंडपाल राजा आहे. तो या पृथ्वीवरील जणू दिक्पालच आहे. त्यामुळे मलय पर्वतावरून वहाणारे चंदनगंधी वारे त्याच्या कीर्तीचा सुगंध गातच नंदनवनापर्यंत फिरत असतात. चोल देशात महीपाल राजा आहे. तो जणू काय युद्धरूपी समुद्राला उकळी आणणारा वडवानळच आहे. आंध्रमधील श्रीशैल राज्यात सिंहासारखा पराक्रमी चंडविक्रम राजा राज्य करीत आहे. याचे सामर्थ्य एवढे आहे की हा नुसत्या हातानेच माजलेल्या हत्तीचे दात उपटून काढू शकतो. याने आपल्या राज्यात ज्योतिर्लिंगे, सिद्धवाटिका आणि ब्रह्मा-विष्णु-महेश यांची देवळे बांधली आहेत. जयपूरच्या परिसरातील मत्स्य देशात विराट् नावाचा राजा आहे. तो संतापला म्हणजे पंचाग्नीसारख्या शूर शत्रूचाही निःपात करतो. कांची नगरात खड्गायुध नावाचा राजा आहे. त्याचे रामभक्त चिरंजीव बिभीषणाशी सततचे राजकीय संबंध आहेत. या खड्गायुधाचा जयजयकार ऐकला की शत्रूच्या माना लाजेने खाली होतात. व युद्धाशिवायच त्यांचा पराभव होतो. चंद्राच्या दर्शनाने भूमंडलावर सागरावर भरते यावे तसे याच्या दर्शनाने शत्रूच्या बायकांच्या डोळ्यांत शोकसागराला भरते येते.'

'कावेरीच्या तटावरील कावेर राज्य, कर्नाटक आणि केरळ यात वज्रविजय, सुभट आणि सौभद्र यांची राज्ये आहेत. त्यांनी आपल्या बाणांनी पराक्रमाची कीर्ती स्वर्गापर्यंत उंचावली आहे आणि तेथे अंधाप्रमाणे स्वैर विहार करणारी देवांची कीर्ती पराभूत करून खाली खेचून आणली आहे. चौल नावाचे बंदर आहे. तेथे रत्नशेखर राजाचे राज्य आहे. याने जलमार्गाने असुरांच्या देशावर स्वारी करून त्यांची भांडारे लुटून आणलेली आहेत व देशोदेशीच्या याचकांना दाने देऊन त्यांना धनवान करून सोडले आहे. त्याच्या दक्षिणेस द्राक्षराम देश आहे. तेथे शशिशेखराचे राज्य आहे. हा राजा गुणामुळे इन्द्रासारखा शोभतो. त्याच्या राज्याला त्याचा मेरू पर्वतासारखा आधार आहे. तेजाने तो बारा सूर्यासारखा असून त्यामुळेच तो पृथ्वीवरील सर्व राजांचा पुढारी आहे. वोडियान देशात काळकोप नावाचा राजा आहे. त्याने पाताळातील मोठमोठे नागराज आपल्या दराऱ्याने जिंकिले आहेत. आंध्र देशात वीरदर्प नावाचा राजा आहे. त्याने तर शत्रूच्या हत्तींच्या मस्तकातील मोत्यांचाच हार केला आहे आणि त्या हारानेच देवाची पूजा केली आहे. कर्णिकी नदीच्या तीरावर रत्नतिलकाचे राज्य आहे. याने आपल्या कीर्तीच्या प्रवाहाने सारी पृथ्वी भिजविली आहे. भद्राचलावर शशांकाचे राज्य आहे. त्याच्या कीर्तीमुळे त्याचेच शशांक नाव धरणारा जो चंद्र तो निर्वीर झाला आहे. आणि त्याच चंद्राला गिळून निर्वाह करणारा राहू ग्रह पराभूत झालेला आहे. त्या महावीराचे खड्ग विजेप्रमाणे चमकू लागले की रक्ताच्या धारा पावसाप्रमाणे कोसळतात. आणि हत्तींच्या गंडस्थळातील मोत्यांचा गारांसारखा वर्षाव होतो. दाभोळ आणि दंड-राजपूर येथील राजे मोठे पराक्रमी आहेत. सारखी युद्धे करून ते शत्रूचा पराभव करतात आणि त्यांच्या बायकांच्या वेण्या आणि कर्णफुलासारखे अलंकार यांचे दान करून रण-

चंडीची हौस भरघोसपणे पुरी करतात. पंडुराजाचे पाच वनवासी मुलगे इकडेच कुठे तरी आहेत. पूर्वी त्यांनी पराक्रमाने देव जिंकले आहेत व देवकन्यांना पळविणाऱ्या दैत्यांचाही आपल्या शस्त्राच्या तेजाने पराभव करून देवकन्यांना अभय दिलेले आहे.'

✠ ✠ ✠

## ३४

## पश्चिमेकडील राजे

किन्नराचे गायन संपले तेव्हा क्षणभर भारावलेली शांती पसरली. नंतर गुर्जर रागाच्या सुरावटीत आलापांना सुरुवात करीत तो किन्नर म्हणाला,

'राजा, आता पश्चिमेकडील क्षत्रियांची माहिती ऐक. पश्चिमेला समुद्रापलीकडे लक्षद्वीप आणि मालद्वीप या नावाची सगळीकडून पाण्याने वेढलेली चौदाशे लहानसहान राज्ये पसरलेली आहेत. परंतु तेथील राजे कुलवान नाहीत. तेव्हा त्यांची नावे कशाला सांगू ? नैर्ऋत्येला महाबाहू नावाचा राजा आहे. तो दानाच्या बाबतीत म्हणजे केवळ सोन्याच्या प्रवाहाची धाराच आहे. नामवंत राजांनाही तो भूषणभूत आहे अशी त्याची कीर्ती दक्षिणेला पसरली आहे. नंतर कोकण. या कोकणात गंध आणि सुगंध या नावाचे दोन राजे आहेत. यांचे अंतःकरण फुलासारखे निष्पाप आहे. फुलासाठी प्रसिद्ध असलेल्या वसंत ऋतूलाही त्यांनी आपल्या विमलगंधी कीर्तीने मागे सारले आहे. त्यांचा पराक्रमही मोठा तोलाचा आहे. ते प्रवृत्तीने थंड असले तरी प्रसंग पडला तर मेरू पर्वतावरही चाल करून जातात. त्यांच्या उत्तरेस कणकेश्वरला श्रीमंत नावाचा राजा आहे. हा इतका सुंदर आहे की त्याचे नुसते दर्शन होताच स्त्रियांच्या मनात शृंगारभावना जन्मते. कूर्ग प्रदेशातील कोळगिरी राज्यात भद्र राजा आहे. त्याच्या डोळ्यांविषयी असे बोलतात की त्या डोळ्यांतील सौंदर्याने चंद्रालाही जिंकले आहे. जंबूखंड म्हणून जे राज्य कोकणात आहे तेथे जयंत राजा राज्य करतो. त्याच्याशी रतिविलास करण्यासाठी प्रत्यक्ष इंद्राणीची दासी स्वर्गातून पृथ्वीवर आलेली होती.

'अगदी समुद्राच्या तीरावर विजय राजाचे राज्य आहे. याच्या शुभ्रकीर्तीच्या प्रकाशाला मर्यादाच नाही. याने एवढी दाने दिलेली आहेत की त्यांच्या संकल्पाच्या पाण्यात मोठमोठे पर्वतही बुडून जातील. तुझ्या मुलीला मागणी घालण्यासाठी त्याच्या दरबारातील राजकारणी पुरुष येऊन गेल्याचे तुला आठवत असेलच. प्रत्यक्ष सागरावर

असे म्हटल्यावर त्याने यमळ आणि अर्जून ही दोन झाडे उपटली असे म्हणण्यात विशेष मोठेपणा नाही. तो नुसती जांभई देतानाच जिथे ब्रह्मांड गिळू शकतो तिथे त्याने बकासुर आणि कागासुर मारले हे सांगण्यात मोठीशी प्रतिष्ठा नाही. आणि जिथे अज्ञानासारख्या महान शत्रूचा त्याने नाश केला आहे, तिथे त्याने अघासुर आणि तृणावर्त यांचा पराभव केला याचा उच्चार करण्यात मोठासा गौरव नाही. यमुनेच्या डोहात कालिया सर्पाचे थोबाड फोडून जेव्हा कृष्णाने त्याला वेसण घातली तेव्हा त्याने जणू मृत्यूच्याच पाठीवर थाप मारावी अशा तोडीचा पराक्रम केला. गोकुळातील गाईवासरे लपविण्याचा पराक्रम ब्रह्मदेवाने केला तेव्हा एखादा खेळ खेळावा अशा सहजपणाने या कृष्णाने ब्रह्मदेवाच्या नाकावर टिच्चून त्याच्या डोळ्यादेखत मायेने गाईवासरे निर्माण केली आणि त्याला धडा शिकविला. या कृष्णाच्या पराक्रमाची कक्षा उंचावत गेली तेव्हा दिव्यावर पतंग जळावे तसे असुर त्या पराक्रमात जळाले. एवढा मोठा कंस राजा, पण तो उभ्याउभ्या काळीज फाटून मेला. जेथे कृष्णाने प्रत्यक्ष यमावरच स्वारी केली आणि यमाने नेलेला सांदीपनी गुरूचा पुत्र सोडवून आणला तिथे त्याच्या अचाट कृतीचे वर्णन तरी कसे करावयाचे !

श्रीकृष्णाच्या पराक्रमाचा ताप सातही समुद्रांना सोसेनासा झाला म्हणून तर ते त्याला शरण गेलेले आहेत आणि त्यांनी आपल्या उदरातून सोन्याची द्वारका काढून ती कृष्णाला खंडणी म्हणून दिली आहे. वेदांची चोरी करून शंखासुर सागराच्या तळीं लपला तेव्हा अंशमात्र सामर्थ्याने श्रीकृष्णाने एखाद्या माशासारखा सागर धुंडाळला आणि शंखासुराला दंड केला. यमुना नदी मार्गात आडवी आली तेव्हा कृष्णाने नुसत्या पायांच्या स्पर्शाने तिचे दोन तुकडे केले. सागरमंथनात मेरू बुडू लागला असताना कृष्णानेच तो मेरू पर्वत आणि सारी पृथ्वी पाठीवर सांभाळली तिथे गाईंची पोटे भरण्यापुरत्या मूठभर गवताने व्यापलेला टिचभर गोवर्धन पर्वत त्याने चेंडूसारखा सावरला यात विशेष सांगण्याजोगे काही नाही. वराहाच्या रूपाने त्याने सारी पृथ्वी दाताच्या एका टोकावर सावरली होती त्यापुढे गोवर्धन पर्वत उचलणे हा मोठा पराक्रम झाला असे सांगणेच लाजिरवाणे आहे. नाना तऱ्हेची रूपे घेऊन कृष्णाने जे पराक्रम केले आहेत त्यांचे नुसते कीर्तन केले तरी मुक्ती मिळते व परब्रह्माची जोड मिळते असे त्याचे भक्त सांगतात. कृष्णाने केलेली ती सारीच अद्‌भुत कार्ये मी इथे सांगेन तर आपण आता ज्या गोष्टींचा विचार करीत आहोत तिच्या चिंतनात उगाच खंड पडेल. ( रासक्रीडा वगैरेंचे खरे रहस्य रुक्मिणीला कळले नाही तर कदाचित तिचा मनोभंग होईल ) त्यामुळे इतकेच सांगतो की श्रीकृष्णाने आजवर जी दाने दिलेली आहेत त्यांच्या पुरात पृथ्वीवरील सारे राजे त्यांच्या लवाजम्या-सह बुडालेले आहेत. आकाशाच्या पृष्ठभागावर तारकांच्या अक्षरांनी तोच इतिहास लिहिलेला आहे. ’

असे म्हणून किन्नर थांबला. त्याच्या गायनातील रसवत्तेने आकाशाची पोकळी

# ३५

## द्वारकेतील राजपुरुष

नंतर किन्नराने गौडी राग आळविण्यास सुरुवात केली. त्या रागाची विशेष मनोहारी अशी सुरावट ऐकताच सारी सभा सावध झाली. रुक्मिणीही औत्सुक्याने ऐकू लागली. तेव्हा तो किन्नर म्हणाला,

'आता आणखी एक क्षत्रिय उरलेला आहे. तो म्हणजे द्वारकेतील यादवकुतिलक श्रीकृष्ण होय. हा कृष्णच माझे स्वतःचे एकमेव आराध्यदैवत आहे. भीमका, हा कृष्ण राजा सोमवंशी आहे. वसुदेव याचा बाप होय. या वसुदेवाचा जन्म यादवांच्या कुळात शूरसेनाच्या पोटी झाला तेव्हा तीनही लोकांत मोठा मंगल उत्सव साजरा झालेला होता. या वसुदेवाला राम आणि कृष्ण असे दोन अत्यंत रूपवान कुमार आहेत. लहान वयाचे असतानाच या दोन कुमारांनी आपल्या पराक्रमाने असुरांच्या आडदांडपणाला खीळ पाडलेली आहे. त्यांच्यासारखे दुसरे क्षत्रिय त्रिभुवनात नाहीत. यांच्या पराक्रमाचे स्मरण होताच आकाशाच्या अंगावर भीतीचा काटा उठतो तीच नक्षत्रे होत. त्यांचे दास्य स्वीकारलेल्या अगणित राजांनी त्यांच्यावर जी छत्रे धरलेली असतात त्यामुळे जिथे असतात तिथे सदाच शीतल सावली असते व दिवस-रात्र असा भेद उरत नाही. परंतु अशी शीतलता तेथे असली व तेथे सूर्यकिरणांना प्रवेश नसला म्हणून तिथे अंधार असतो असे मात्र नव्हे. कारण महारुद्रासारखा पराक्रमी असा श्रीकृष्णाचा मोठा भाऊ जो राम त्याचा मुखचंद्र कृष्णाच्या पुढे सारखा प्रकाशात असतो व त्याच्या चांदण्या-सारख्या प्रकाशामुळे छत्र्यांखालील अंधार नाहीसा होतो. हा बळिराम असा पराक्रमी आहे की त्याने नांगराच्या फाळानेच सारी पृथ्वी खणून काढलेली आहे. त्याचे पुरते बळ कोणी जाणतच नाही. हिमालयातून गंगा नदी खाली उतरते तिला भागीरथी म्हणतात. परंतु तिला भगीरथाने आणली ही आपली वदंताच आहे. खरा प्रकार असा आहे की बळिरामाच्या पराक्रमाचा ताप हिमालयाला सहन होऊ शकला नाही. त्याच्या माथ्यावरील बर्फ त्या उष्णतेने वितळले आणि त्याच्याच प्रवाहाची नदी होऊन वाहू लागली तीच गंगा नदी होय.

✠ ✠ ✠

## आणि आता श्रीकृष्ण

" श्रीकृष्ण हा या बळिरामाचा धाकटा भाऊ. हा तर इतका सुन्दर आहे की त्याचे नुसते दर्शन स्त्रियांना झाले की त्यांच्या मनांत कामवासना जन्म पावते. त्याने आपल्या शस्त्रांना नुसता हात घातला की देवांची आसने डळमळू लागतात. या कृष्णाची थोरवी गावयास वेदांनी आरंभ केला. परंतु गाता गाता ती संपेनाच. म्हणून त्या वेदांना सदैव स्तुती करणाऱ्या स्तुतिपाठकाचे स्वरूप प्राप्त झाले. मी याची सारीच थोरवी इथे सांगेन म्हटले तर शक्यच नाही. परंतु काही थोडी सांगतो ती ऐक. श्रीकृष्ण समुद्राच्या पोटातील एका बेटावर राज्य करतो. पण स्वर्गातील देवही त्याची आज्ञा शिरावर धरतात. दीन दुबळ्यांच्या दुःखाचे निवारण करण्यात हा इतका मग्न असतो की, ब्रह्मदेव भेटीला आले तरी त्यालाही याची भेट लगेच मिळत नाही व वाट पहात थांबावे लागते. याचे मोठेपण किती सांगावे ! अनादी अनंत काळाचाच तो स्वामी झालेला आहे. आपल्या सत्त्वगुणी वृत्तीने त्याने अमरता मिळवली असल्याने सर्व काळाचा महाकाळ जो मृत्यू त्यालाच एखाद्या दोरीने बांधून टाकावे तसे त्याने केलेले आहे. स्वर्ग, मृत्यू , पाताळ हे तीनही लोक ईश्वरी मायेची खेळणी आहेत. अशी जी सर्वसमर्थ माया तिलाही कृष्णाचे थोरपण जिथे संपूर्ण आकलन होत नाही तिथे मी ते बोलून किती बोलू ? बेटावरील एका एवढ्याशा भूभागाचे राज्य तो करतो. पण इतर विस्तीर्ण पृथ्वीवरील छप्पन्न कोटी राजे त्याच्या सेवेसाठी तिथे जमा होतात. तेहतीस कोटी देवही त्याच्या सेवेस हजर असतात. हे जे आकाश आपण पाहतो ते पूर्वी पांढरे होते. परंतु कृष्णाच्या पराक्रमाच्या प्रखर तापाने ते होरपळले तेव्हापासून ते काळसर झाले आहे. त्याच आगीत जळाला तेव्हापासूनच हा सूर्यही उष्ण झाला आहे. कृष्णाच्या तरवारीला जिथे प्रत्यक्ष राहूच भितो तिथे त्याच्या पराक्रमाचे वर्णन काय करावे ! वदतो-व्याघात वाटेल, पण वस्तुस्थितीच अशी आहे की चन्द्राने सूर्याला गिळिले आहे. चंद्रासारखी शीतल अशी कृष्णाची कीर्ती पसरल्यावर मोठमोठ्या राजांचे सूर्यासारखे प्रताप जागच्या जागी थंडावलेले पाहून दुसरे काय म्हणावयाचे ? चंद्र-सूर्याची ग्रहणे ही अल्प काळ टिकणारी असतात. परंतु कृष्णाच्या शत्रूंना त्याच्या पराक्रमाचे जे ग्रहण पडलेले आहे ते सर्वग्रास ग्रहण आहे, ते असुरांच्या बायकांच्या वाट्याला कायमचे आलेले आहे. म्हणून त्यांनी आपले सर्व शृंगारालंकार दाने म्हणून तीर्थात देऊन टाकले आहेत. अविद्या ही खरे म्हणजे केवढी महाराक्षसी. पण तीही कृष्णाचे नाव ऐकताच जिथे नाश पावते तिथे पूतनेसारख्या एका अबलेला त्याने मारले असे सांगण्यात काही विशेष भूषण नाही. या संसाराचेच अरण्य त्याच्या नुसत्या स्मरणाने नाश पावते

असे म्हटल्यावर त्याने यमळ आणि अर्जून ही दोन झाडे उपटली असे म्हणण्यात विशेष मोठेपणा नाही. तो नुसती जांभई देतानाच जिथे ब्रह्मांड गिळू शकतो तिथे त्याने बकासुर आणि कागासुर मारले हे सांगण्यात मोठीशी प्रतिष्ठा नाही. आणि जिथे अज्ञानासारख्या महान शत्रूचा त्याने नाश केला आहे, तिथे त्याने अघासुर आणि तृणावर्त यांचा पराभव केला याचा उच्चार करण्यात मोठासा गौरव नाही. यमुनेच्या डोहात कालिया सर्पाचे थोबाड फोडून जेव्हा कृष्णाने त्याला वेसण घातली तेव्हा त्याने जणू मृत्यूच्याच पाठीवर थाप मारावी अशा तोडीचा पराक्रम केला. गोकुळातील गाईवासरे लपविण्याचा पराक्रम ब्रह्मदेवाने केला तेव्हा एखादा खेळ खेळावा अशा सहजपणाने या कृष्णाने ब्रह्मदेवाच्या नाकावर टिच्चून त्याच्या डोळ्यादेखत मायेने गाईवासरे निर्माण केली आणि त्याला धडा शिकविला. या कृष्णाच्या पराक्रमाची कक्षा उंचावत गेली तेव्हा दिव्यावर पतंग जळावे तसे असुर त्या पराक्रमात जळाले. एवढा मोठा कंस राजा, पण तो उभ्याउभ्या काळीज फाटून मेला. जेथे कृष्णाने प्रत्यक्ष यमावरच स्वारी केली आणि यमाने नेलेला सांदीपनी गुरूचा पुत्र सोडवून आणला तिथे त्याच्या अचाट कृतीचे वर्णन तरी कसे करावयाचे !

श्रीकृष्णाच्या पराक्रमाचा ताप सातही समुद्रांना सोसेनासा झाला म्हणून तर ते त्याला शरण गेलेले आहेत आणि त्यांनी आपल्या उदरातून सोन्याची द्वारका काढून ती कृष्णाला खंडणी म्हणून दिली आहे. वेदांची चोरी करून शंखासुर सागराच्या तळीं लपला तेव्हा अंशमात्र सामर्थ्याने श्रीकृष्णाने एखाद्या माशासारखा सागर धुंडाळला आणि शंखासुराला दंड केला. यमुना नदी मार्गात आडवी आली तेव्हा कृष्णाने नुसत्या पायांच्या स्पर्शाने तिचे दोन तुकडे केले. सागरमंथनात मेरू बुडू लागला असताना कृष्णानेच तो मेरू पर्वत आणि सारी पृथ्वी पाठीवर सांभाळली तिथे गाईंची पोटे भरण्यापुरत्या मूठभर गवताने व्यापलेला टिचभर गोवर्धन पर्वत त्याने चेंडूसारखा सावरला यात विशेष सांगण्याजोगे काही नाही. वराहाच्या रूपाने त्याने सारी पृथ्वी दाताच्या एका टोकावर सावरली होती त्यापुढे गोवर्धन पर्वत उचलणे हा मोठा पराक्रम झाला असे सांगणेच लाजिरवाणे आहे. नाना तऱ्हेची रूपे घेऊन कृष्णाने जे पराक्रम केले आहेत त्यांचे नुसते कीर्तन केले तरी मुक्ती मिळते व परब्रह्माची जोड मिळते असे त्याचे भक्त सांगतात. कृष्णाने केलेली ती सारीच अद्‌भुत कार्ये मी इथे सांगेन तर आपण आता ज्या गोष्टींचा विचार करीत आहोत तिच्या चिंतनात उगाच खंड पडेल. ( रासक्रीडा वगैरेचे खरे रहस्य रुक्मिणीला कळले नाही तर कदाचित तिचा मनोभंग होईल ) त्यामुळे इतकेच सांगतो की श्रीकृष्णाने आजवर जी दाने दिलेली आहेत त्यांच्या पुरात पृथ्वीवरील सारे राजे त्यांच्या लवाजम्या-सह बुडालेले आहेत. आकाशाच्या पृष्ठभागावर तारकांच्या अक्षरांनी तोच इतिहास लिहिलेला आहे. '

असे म्हणून किन्नर थांबला. त्याच्या गायनातील रसवत्तेने आकाशाची पोकळी

भरून निघाली होती. क्षणभर विश्रान्ती घेऊन नंतर त्या किन्नरने चतुर्विध नृत्याचा आविष्कार करावयास आरंभ केला. नाचत गात तो म्हणाला,

✠ ✠ ✠

३७

## श्रीकृष्णाचे सौंदर्य

' श्रीकृष्णाचे रूप पाहताना जो आनंद होतो त्यापुढे ब्रह्मानंदही उणा पडतो. या पृथ्वीवर सौंदर्याचे असे कोणतेही तोलमाप नाही की त्याच्या उपमेने कृष्णाचे सौंदर्य तोलता येईल. त्याचे वदन चंद्रासारखे सुंदर आहे. डोळे कमळाहून अधिक रेखीव आहेत. त्याचे वक्षःस्थळ विशाल आहे. त्याचे सुरेख हात गुडघ्यांना पोहोचावे इतके लांब आहेत. त्याच्या ओटीपोटावर सुंदर तिहेरी लंब आहे. त्याच्या ठेंगण्या ठुसक्या पौरुषाचे सौंदर्य केवळ अवर्णनीय आहे. त्याच्या घोटीव पार्श्वभागाची आवळ ठेवणच अशी की तिच्यावर नुसती नजर पडताच स्त्रियांना माज येतो. त्याच्या भरीव मांड्या मोठ्या पिळदार आहेत. पोटऱ्या आटीव आणि घाटदार आहेत. त्याचे चरण तर विश्वातील तीर्थांचे उगमस्थान आहेत. त्याचे सौंदर्य वर्णन करणेच कठीण.

श्रीकृष्ण संसाराची उठाठेव नाहीशी करतो. अज्ञानाची लिखावट पुसून त्याची नावनिशीही नाहीशी करतो; यापुढे तो दानवावरचे मोठे संकट आहे हे आणखी सांगणे म्हणजे वायफळच आहे. तसा पहिल्यास त्याचा बांधा मध्यमसाच आहे. परंतु सौंदर्य मात्र साऱ्या सृष्टीहून आगळे आहे. या सौंदर्याचे दर्शन झाले म्हणजे तीनही लोकांना ते पाहण्यासाठीच सर्वांगी डोळे फुटतात. सर्व वृत्ती डोळ्यांतच जमा होऊन कृष्णाचे सौंदर्य तेवढे पहावे हाच एक ध्यास उरतो आणि इतर साऱ्या गोष्टींचा विसर पडतो. त्याचा वर्ण सावळा आहे. पण तो इतका तेजाळ आहे की इंद्रनीळ मण्याचेही तेज त्याच्यापुढे फिके पडते. जणू काय श्रीकृष्णाला भुललेल्या निळ्या कमलांची शोभाच त्या कमलांना सोडून श्रीकृष्णाच्या सेवेला आली आहे असे वाटते. प्रतिपदेचा चंद्र कृष्णाला पहातो तेव्हा त्याला त्याच्या विरूपतेची लाज वाटते आणि रोज एक एक कला वाढवून तो कृष्णाच्या सौंदर्याची बरोबरी करू पहातो. आणि शेवटी ती बरोबरी होत नाही असे पाहिल्यावर निस्तेज होऊन दर दिवशी थोडा थोडा झिजत जातो.

नदीच्या धारेत भोवंडा असावा असे काही तरी कृष्णाच्या दृष्टीत आहे. साधुपुरुष

एकदा दृष्टीच्या धारेत सापडले की मग त्यांची मने तेथून मागे निघूच शकत नाहीत. श्रीकृष्ण स्मितहास्य करतो तेव्हा नयनांतून ओसंडणारे हास्यसौंदर्य गालांच्या सौंदर्यात जुळून जाते आणि तेव्हा श्रीकृष्णाच्या चेहऱ्यावर आकर्षक माधुरीची रसाळ शोभा तरळू लागते. अजून हा कृष्ण फारसा थोराड झालेला नाही. त्याच्या पुरुषसौंदर्याने तीनही लोकांना जिंकून टाकले आहे. जणू काय त्याच्या लावण्याच्या प्रकाशाने चंद्र-सूर्यही लुप्तप्राय झालेले आहेत. ज्या रूपाच्या दर्शनानेच स्त्रियांच्या मनातून आपोआप कामभाव पाझरतो त्याचे वर्णन करणेच कठीण आहे. मात्र या रूपाचे नवल असे की जसा त्याचा वेध विलासिनी नारींना लागतो तसाच तो मनोजयी मुनिवरांनाही लागत असतो.

श्रीकृष्ण म्हणजे सुखाची सुंदर मूर्तीच आहे. तो म्हणजे जणू जगातील सतेज माधुरी आहे. त्याची वाणीही इतकी मधुर आहे की अमृताची माधुरीही त्या वाणीची दासी शोभावी. रत्नांनाही लाजविणारे ते रूप जेव्हा दिसते तेव्हा पशुपक्षीही भुलून मुग्ध होतात. त्याचे नुसते नाव ऐकूनच त्याचे वेध लागतात. त्याच्या सौंदर्याची गोडी खरोखर अवर्णनीय आहे. उतास जाणारे ते वेधक सौंदर्य पाहून जिथे मुनिवरही वेडे होतात तिथे तीनही लोकांतील कामिनी त्याच्या गळयात पडण्यासाठी उतावीळ झाल्या तर त्यात नवल नाही. परंतु तो मात्र यातील कुठच्याही स्त्रीचा स्वीकार करीत नाही. अविवाहित स्त्रियाच त्याच्या मागे लागतात असे नाही, तर विवाहित स्त्रिया आणि तपस्विनीही त्याच्यावर भुलतात. तिथे बाजारात फिरणाऱ्या काही गौळणी त्याच्यावर भुलल्या होत्या अशी अफवा आहे तिच्यात काही विशेष नाही.

माधवी नावाची चंद्राची मुलगी लक्ष्मीपेक्षाही सुंदर आहे. ती हल्ली ‘ मला कृष्णाला देणार ’ असा बडेजाव मिरवीत असते. तीही कृष्णाची प्राप्ती व्हावी म्हणून यमुनेच्या जळात उभी राहून तपश्चर्या करीत आहे. स्त्रियांना कृष्णाचा वेध इतका लागलेला आहे की, त्यांचे त्यांचे पती जेव्हा त्यांच्याशी रतिक्रीडा करतात, तेव्हां त्या पतीपासून त्यांना सुख होत आहे असे ढोंग करण्यासाठी नेत्र मिटतात आणि मिटल्या डोळ्यांपुढे कृष्णाचे रूप आणून तोच आपला उपभोग घेत आहे अशी कल्पना करण्याची पराकाष्ठा करतात. याला एकही स्त्री अपवाद नाही. खरोखर असा सुंदर पुरुषच दुसरा नाही. विशेष म्हणजे अजून त्याच्यावर कुणाही स्त्रीच्या रूपाची मोहिनी पडलेली नाही.

मी नुकताच तिकडे होतो तेव्हा रुक्मिणीच्या परिसरात आलेल्या काही भाट स्त्रिया तिकडे गेलेल्या होत्या. त्यांच्या मुखातून रुक्मिणीचे वर्णन ऐकून कृष्णाने त्यांचे मोठे आदरातिथ्य केले. त्याचप्रमाणे रुक्मिणीबरोबरच नृत्य-गायन शिकलेली मदनमुद्रा नावाची स्त्री नुकतीच तिकडे गेली होती तिचाही कृष्णाने सत्कार केला आणि तिच्या कलांचा आस्वाद घेतला. तसेच एकदा नारद तिथे फिरत फिरत आलेला होता तेव्हा त्याने रुक्मिणीने रचलेले एक काव्य कृष्णाला गाऊन दाखविले. तेव्हापासून रुक्मिणीच्या कवितेविषयी कृष्णाच्या मनात मोठी आदरबुद्धी निपजली आहे. या लावण्यसुंदर रुक्मिणीला

सुंदर नवऱ्याची जोडी लाभावी असे मनात असेल तर मला वाटते याच एका श्रीकृष्णाला तिचा स्वीकार करण्याची विनंती करावयास हवी.'

✠ ✠ ✠

३८

## किन्नराची स्तुती

किन्नराने श्रीकृष्णाच्या रूपाचे वर्णन सभेला केले तेव्हा सुखाचे भरते आले. रुक्मिणीचे तर अंग अंग रोमांचित झाले. बाणाने अलगद तोडलेला चंदनाचा कोवळा अंकुर कोमेजून जावा तशी तिची अवस्था कृष्णाच्या प्रीतिशराने झाली. भीमकाच्या ते लक्षात आले. उचित शब्दात किन्नराचा गौरव करीत तो म्हणाला,

'संगीतातील अशी आश्चर्यकारक निपुणता तीनही लोकांत कुठे ऐकिली नव्हती. श्रुती, स्वर, स्वरसमूह, गमके, सारी एका मागून एक अशी प्रकट झाली. संध्याकाळी आवळ्या सावळ्या रंगाच्या एकाहून एक सुरम्य छटा एकातून एक प्रकट व्हाव्या आणि शेवटी त्यातून शशांक चंद्र डोकवावा म्हणजे तो पाहून जो आनंद होतो तसा आनंद आज या गायनाने लाभलेला आहे. शास्त्रीयतेत मिसळलेले ढंगदार रंग, रंगात सजीव झालेले जिवंत रस, आणि रसात ओथंबलेले माधुर्य यांचा हा मिलाफ केवळ अनुपम आहे. सत्यलोकातील नारद आणि तुंबरू या गवयांपेक्षाही किन्नर श्रेष्ठ आहे. संगीताचे भेद गाताना याचे जे मनोहर हावभाव झाले तेही अतिव रम्य होते. रसरंगाच्या या सोहळ्यात बुडाल्यावर मला तर असे वाटत आहे की ही सारीच सृष्टी बारीक पिंजलेल्या मृदुमुलायम अशा सुगंधी केशराने कोंदलेली आहे. किन्नराचे गायन ऐकून थक्क झालेली माझी सभा स्वर्गातून उतरून आलेल्या देवांच्या भाग्यवान सभेसारखी दिसत आहे.'

अशा प्रकारे भीमकाने गाणाऱ्या किन्नराचे अंगसौंदर्य आणि त्याच्या बोलांचे रससौंदर्य यांचा सभासदांपुढे गौरव केला आणि तो किन्नराला म्हणाला,

'वेदघोषा, आमचे परमभाग्य म्हणून तू आज इथे आलास आणि तीनही लोकांतील राजांचे वर्णन करून दाखविलेस.'

असे म्हणून भीमकाने हत्ती, रथ, घोडे, जमीन आणि गावे यांची इनामे, पुष्कळसे धन, नाना प्रकारची वस्त्रप्रावरणे आणि कापसासारखे शुभ्रधवल दिसणारे विशाल छत्र

आल्हादकारी प्रभा तीनही लोकांत भरून उरावी अशी आहे. हा विचार मनात येताच तो म्हणाला,

'अरे! हे खरोखरच स्त्रीचे रूपसौंदर्य आहे की ही रूपसौंदर्याची ओतलेली मूर्ती आहे? की शंकर आपणाला जाळील या भीतीने मदनाने हे स्त्रीत्वाचे रूप स्वीकारले आहे? यात खरे काय हेच मला कळेनासे झाले आहे. या सौंदर्याचा सत्कार कोणत्या शब्दांनी करावा याचेही भान मला उरलेले नाही. डोळे तर सहजासहजी हिच्यावर जडले ते तिथून हालतच नाहीत. त्यांचा जणू हिच्या सौंदर्याशी वज्रलेप झाला आहे. मी इतकी देशांतरे केली, पण अशा प्रकारचे चेतोहर लावण्य असू शकेल असे कुठे ऐकिलेही नव्हते. हे सौंदर्य मी आजवर पाहिले नव्हते म्हणजे मी सृष्टीत काहीच पाहिले नव्हते असे नाही काय? रूप आणि गुण यांनी रुक्मिणीला तोलून दिसेल असे सौंदर्य तीनही लोक धुंडिले तरी दिसणे शक्य नाही. मला तर हिची लक्षणे अशी दिसत आहेत की ही एका आदिपुरुष श्रीकृष्णालाच बायको शोभून दिसावी. हिचे रूप आणि तारुण्य ऊतू जात आहे. पण अजून हिचा विवाह झालेला नाही. साहजिकच आहे. त्रिभुवनातील सारेच राजे हिच्या तुलनेने हिणकस आहेत. हिचा एक एक अवयव पाहून जो आश्चर्याने स्तंभित होऊन जागच्या जागी थांबत नाही असा कोणी असणे शक्य आहे काय? ही ज्याला माळ घालील असा श्रेष्ठ पुरुष या तीनही लोकांत कोण बरे आहे? विद्याधरी-सारख्या सुंदर अशा या राजकन्येला पृथ्वीवरील राजे योग्यच नाहीत. मला नवल वाटत आहे. श्रीकृष्ण परमात्मा हिचा स्वीकार करील असा काही संभव आहे काय? त्याने हिला वरिले तर मात्र हिचे अहोभाग्य ठरेल.'

भाटाने केलेले हे रुक्मिणीच्या रूपाचे कौतुक पाहून राजाने त्याचा आणखी सत्कार केला. रुक्मिणीचे रूप पाहून कल्याणकीर्तीला वाटलेले आश्चर्य त्या अपूर्व सत्काराने दुणावले. तो म्हणाला,

'राजा तुझ्यासारखा दुसरा सर्वसमर्थ राजा मी तरी पाहिलेला नाही.'

✠ ✠ ✠

## २१

## राजाचा प्रश्न

मग भीमकाने त्या श्रेष्ठ भाटाचा आणखीही खास पाहुणचार केला. त्याला वस्त्रे-प्रावरणे देऊन त्याचा सत्कार केला. शत्रुराज्यातून जिंकून घेतलेले खानदेश आणि

## ४०

## भीमकाचा विचार

किन्नराचा तो संगीताचा कार्यक्रम ऐकून सभा आश्चर्याने थक्क झाली होती. तिच्याकडे पाहून भीमक अमात्याला म्हणाला,

" आता तुम्हाला माझ्या मुलीसाठी नवरा शोधावयाची जरूर नाही. आमचे पुण्य थोर. त्यामुळे हा किन्नर दारात चालत आला आणि त्याने भूमंडळावरील साऱ्या क्षत्रियांचे वर्णन केले. किन्नर त्या राजांचे वर्णन करीत होता. तेव्हा त्यातील कोणीच भीमकीच्या मनाला रुचत नव्हता. परंतु त्याने श्रीकृष्णाच्या रूपाचे वर्णन सुरू करताच ती उल्हासाने फुलून एकदम उन्मुख झाली हे तुम्ही पाहिलेच आहे. अर्थात आता श्रीकृष्ण सोडून दुसरा वर शोधण्याची आवश्यकता नाही. आता प्रश्न एवढाच आहे की, आपण ती कृष्णाला देऊ म्हटले तर तो तिचा स्वीकार करील की नाही हे समजत नाही. ती तर इतर कुणाशीही विवाह करून कोणत्याही परिस्थितीत संतुष्ट होणार नाही हेही तेवढेच निश्चित आहे. "

✠ ✠ ✠

## ४१

## रुक्मीची कृष्ण-निन्दा

भीमक एकीकडे असे बोलत होता. त्याचा मोठा मुलगा रुक्मी हा तिथेच राजसभेत होता. हा शिशुपालाचा मित्र आणि कृष्णाचा शत्रू होता. त्यामुळे कृष्णस्मरणाने फुलणाऱ्या रुक्मिणीच्या मनोकमलाला शोकाने मिटवून टाकणारा तो जणू प्रदोषकालच होता. वस्तुतः रुक्मी हा मोठा दाता होता. याचक मुका असला, त्याला मागणी करता येत नसली तरीही रुक्मी त्याची पात्रता पाहून त्याला संपूर्ण मेरू पर्वताचेही दान करीत असे. असे असूनही त्याने कल्याणकीर्तीचा मुळीच सत्कार केला नव्हता. कारण कृष्णद्वेषाच्या पाखंडाने त्याला व्यापलेले होते आणि कल्याणकीर्तीच्या अनुचरात कृष्णभक्तांचा तांडा होता. भीमकाने कृष्णास रुक्मिणी देण्याचा निर्णय बोलून दाखविला तेव्हा रुक्मीला कुत्सित हसू आले आणि तो म्हणाला,

' शापाने बुद्धिभ्रष्ट झालेला हा वेडपट वेदघोष महर्षी जे मनाला आले ते भलते-सलते बरळून गेला. त्याने तुम्हाला झुलविण्यासाठी ज्या थापा मारल्या त्यावर तुम्ही विश्वास ठेवीत आहात आणि श्रीकृष्णाला फुकटचे मोठेपण लावीत आहात. अहाहा! काय तुमचे शहाणपण ! या कृष्णाला जात नाही, कुळ नाही. आईबापाचा पत्ता नाही. कुणाचा कोण हे माहीत नसल्याने अनाथासारखा याला गवळ्यांनी वाढविला आहे. आणि त्याच्यावर प्रतिष्ठेचा खोटाच ठसा उठविला आहे. वेदशास्त्रांना असंमत असे याचे सारे वर्तन आहे. रूपाने काळाकुट्ट असणारा हा कृष्ण दुर्गुणांचा पुतळा आहे. नुकताच त्याने घरातल्या घरात आपल्या मामाचा खून केला आहे. हातात वेताची काठी हे याचे शस्त्र आहे. ते कधी संग्रामात कुणाच्या खड्गाला भिडविण्याची शक्यताच नसल्याने वेळ येईल तशी अफाट बडबड करणे हाच त्याचा पराक्रम आहे. ऋषींच्या व्रतस्थ बायकांनाही फूस लावणारे याचे सौंदर्य हेच याचे मोठे भांडवल आहे. एक स्त्री याच्या वाऱ्यालाही उभी रहात नाही. गौळणी याचा तिरस्कार करून याला शिव्या देतात. कुठची बाई हाताला लागणे अशक्य झाले म्हणून याने जालंदराची बायको तुळशी हिलाच बनविले व आपल्या एकटेपणातील ओढाळ वळवळ तिच्या संगतीत शांत केली. हा गवळी धड गुणाचा नव्हे बरे ! त्यापेक्षा शिशुपाल हाच नवरा रुक्मिणीला योग्य आहे. याने आपल्या पराक्रमाने काळाचाही पराभव केला असून दास म्हणून त्या काळाचे चित्र आपल्या पायातील तोड्यावरच कोरलेले आहे. तो बुद्धिवान आहे. मोठा रूपवान आहे. तो कुलवान क्षत्रिय आहे. तो दाता आहे. उदार आहे. त्याने आपल्या पराक्रमाने ज्याला लाजविलेले नाही असा एकही राजा पृथ्वीवर शिल्लक नाही. म्हणून तोच रुक्मिणीला योग्य वर आहे. '

✠ ✠ ✠

## ४२

## भीमकाची संमती – आमंत्रणे

अशा प्रकारे रुक्मीने शिशुपालाची पुष्कळच स्तुती केली. भीमकाला त्याची भीड मोडवेना म्हणून त्याला ते म्हणणे मान्य करावे लागले. नंतर दोघांनी एकत्र बसून तीच सोयरीक ठरविण्याचा विचार पक्का केला. रुक्मी हा पट्टराणीचा मुलगा होता. युवराज होता. त्यामुळे त्याच्या बोलण्याची उपेक्षा करणे भीमकाला जमले नाही. बेत पक्का

झाल्यावर शिशुपालाला बोलाविण्याचे ठरले आणि त्या कामाचा आदेश कोशाधिकारी रत्नशेखर याला देण्यात आला. नंतर पृथ्वीवरील इतरही सर्व राजांना आमंत्रणे पाठविण्याची व ऋषीमुनींना आदराने बोलावून आणण्याची व्यवस्था केली गेली.

✠ ✠ ✠

४३

## रुक्मिणीचा शीण

इकडे रुक्मिणीची अवस्था वेगळीच झाली होती. किन्नराने केलेले कृष्णाचे वर्णन ऐकून तिला त्याचे वेध लागले होते. ती विरहाने व्याकुळ झालेली होती व पाण्याशिवाय सुकून गेलेल्या कल्पलतेप्रमाणे कोमेजून गेली होती. जो तिच्या मनात भरला होता त्या श्रीकृष्णाला बाजूला सारून रुक्मीने चांडाळ शिशुपालाची भलावण चालविली होती. त्यामुळे तिला जो शीण होत होता तो कुठे बोलताही येत नव्हता. कोमल कमलिनी असावी, ती सूर्याच्या उष्णतेने उकडून जावी, त्यात आणि तिच्यावर चिखल उपडा व्हावा, आणि नंतर भोवती वणवा पेटावा तशी त्या बिचारीची अवस्था झाली होती.

✠ ✠ ✠

४४

## रुक्मिणीची विरहावस्था

परंतु त्या अवस्थेकडे कुणाचे लक्ष नव्हते. तिला शिशुपालाला देऊ केली आहे अशी घोषणा करून भीमकाने तिला राजवाड्यात जावयास सांगितले होते. ती बिचारी निघाली खरी. पण तिला उभे राहण्याचेही भान नव्हते. तिची अवस्था पाहून सख्यांनी तिच्यासाठी पालखी आणली आणि मग मैत्रिणींचा आधार घेऊन ती कशीवशी त्या

पालखीत शिरली. प्रियकराच्या विरहाची ओढ ही वेगळीच असते. एकदा तिचा उद्रेक झाला की विरहिणी तत्काळ हतबल होतात.

त्यात आणि रुक्मिणीचा लाडका कृष्ण हा मनोजयी पुरुषांनाही भूल पाडावी असा सुंदर होता. किन्नराच्याही भक्तीचा तो विषय असल्याने त्याचाही जीवभाव त्याच्याशी जडला होता आणि त्याने जाणतेपणाने रंगून जाऊन वर्णन करताना कृष्णाला जणू मूर्त समोर उभे केले होते. भल्या भल्यांना पिसे लावणारी ही परिस्थिती. तिथे बापुड्या अबला रुक्मिणीची पाड काय लागणार ! ती तर अगदी अळुमाळ झाली होती. ती कष्टाने पालखीत बसली तेव्हा छत्रधारिणीने तिच्यावर छत्र धरले. इतर मैत्रिणी आणि दासी घोड्यावर आणि शिंगरावर बसून बाजूने चालू लागल्या. वाहनावर गाढून बसताच उठावलेले त्यांचे रूपाळ अवयव साऱ्या त्रिभुवनाच्या मनात गाढ विकाराची उधळण करू लागले. रुक्मिणीची इतकी व्याकुळ अवस्था झाली होती. परंतु या दासी आणि राजकन्या उठवळपणे एकमेकींच्या चेष्टा करीत चाललेल्या होत्या. बोलता बोलता त्या भीमकाचे नाव घेऊन शपथा घालीत होत्या, घेत होत्या. शिष्टांच्या वागणुकीच्या कलेत पारंगत असणाऱ्या रुक्मिणीला हा अप्रासंगिक थिल्लरपणा सहन झाला नाही. अशक्त आणि व्याकुळ असताही ती त्यांना म्हणाली,

' ज्यांच्या वर्तनाचा सच्चेपणा हा उघडउघड असतो त्यांनी उठल्यासुठल्या कधी शपथा घेत बसू नये. माणसाच्या माणूसपणातील उणीव लपविण्याची असेल तेव्हाच शपथ घेण्याचे कष्ट उचलावे. '

एवढेच बोलून श्रमलेली रुक्मिणी पुन्हा पालखीत विसावली. चूपचाप झालेल्या सख्यांनी तिला झटकन वाहून उपवनातील विहारगृहाकडे नेली. तेथे अंथरूण घालण्याच्या कामावर असणाऱ्या दासींनी आधीच त्वरा करून सुखकर अशी शय्या रचिलेली होती.

✠ ✠ ✠

४५

## रुक्मिणीला मूर्च्छा येते

विहारगृहाच्या दारात येताच रुक्मिणी पालखीतून उतरू लागली. पण ती पायांत पादत्राण घालू पहात आहे तोच तिच्या विकल शरीराचा तोल गेला आणि तिला भोवळ आली तेव्हा दासींची एकच धांदल उडाली. एकीने तिला सावरून तिचे डोके आपल्या

छातीवर आधारिले. दुसरी तिचे डोळे झाकू लागली तर ते मिटेचनात. तिसरी तिला पदरानेच वारा घालू लागली.

क्षणभराने तिची ही भोवळ उतरताच दासींनी तिला सांभाळून आत नेली आणि मंचकावर बसविली. नंतर राजघराण्यातील रीतीप्रमाणे पंचारतीची तबकात नीरांजने पेटवून तिला ओवाळली. नंतर तिला कापुरसुगंधी विडा खावयास दिला. नंतर राजकन्या विश्राम-गृहात आलेली आहे हे संबंधितांना कळविण्यासाठी कुशल असे भोई लोक मानाच्या विड्यासह चोहीकडे पाठविले. सतत जागता पहारा करण्यासाठी अगदी जवळचे असे होते ते घोडेस्वार सैनिक दारांत ठेवले. नंतर भेटीसाठी आलेल्या भाट कुलांतील स्त्रियांना मोठमोठी दाने देऊन त्यांची लगोलग पाठवणी केली. विडे देणाऱ्या दासीकरवी आठवण-पूर्वक सर्व मैत्रिणींना विडे पोहोचतील अशी योजना केली.

✠ ✠ ✠

४६

## रुक्मिणीवर उपचार करतात

नंतर दारे अर्धवट ओढून आडोसा करण्यात आला. रुक्मिणीच्या चोळीचे बंध ढिले केले जाताच तिचे स्तन सैलावलेले तिला जाणवले आणि तिने पदर सावरला. परंतु तेवढेही श्रम तिला मानवले नसावे, तशा रीतीने तिच्या ओठांतील विडा बाहेर ओघळला. अतिशय आळसाने जडावून धुंद झाल्यासारखी ती दिसू लागली. मग दासींनी व सख्यांनी तिचे पाय धुतले आणि तिच्या अंगावरील सभावस्त्रे दूर करून तिला तलम रेशमी वस्त्र नेसविले. कापूर मिसळलेल्या पाण्याने तिच्या तोंडावर हबके मारले. नंतर पाणी देणाऱ्या दासीने विड्याचे ओठ स्वच्छ करण्यासाठी शुद्ध पाण्याची चूळ तिला दिली. कोमल देहाची मालती हळुवारपणे मागे टेकली व तिने रुक्मिणीला आधारून धरले. गंधावती वाळ्याच्या सुगंधी पंख्यांनी वारा घालू लागली. नंतर पानदानधारिणी दासीने खिन्नपणे तिला सुपारीशिवाय बनविलेला नाजूक विडा दिला. नंतर कापुराचा करंडा तिच्यासमोर धरला. त्याने तर तिच्या विरहव्यथांना नवेच भरते आलेसे झाले. नंतर तिच्या गाइकेने पंचम स्वरात गोड गीत गाऊन दाखविले तरी तिकडेही तिचे लक्ष लागेना. सभेत कृष्णाचे वर्णन ऐकायला रुक्मिणीची जशी तंद्री लागली होती तशीच ती आताही लागलेली होती. परमेश्वराच्या ओढीने उन्मनी अवस्था झाली म्हणजे स्थल-

कालाचे भान रहात नाही तसे तिला झाले होते. सखीला टेकून बसल्या बसल्याच मान टाकून ती शयनावर कोसळली.

✠ ✠ ✠

४७

## सख्यांचे तर्क

तिची ती अवस्था पाहून तिच्या दासी अतिशय व्याकुळ झाल्या. त्या एकमेकीला म्हणू लागल्या,

'पहिला विडा दिला होता त्यातील सुपारी हिला पुन्हा पुन्हा लागत आहे की काय ?'

'अग, मला वाटते हिला भूतबाधा झाली असावी.'

'काही तरीच काय बोलतेस ? हिला कसला तरी मोठा विकार झाला आहे.'

'मी सांगते. मघा महाराजांनी हिला विडा दिला ना ? त्यातील कापूर नीट मुरलेला नव्हता. तोच हिला बाधला आहे.'

'मला वाटते तिला काही पायाबुडी झाले असावे.'

'ती काय चालत आली वाटते ? पायाबुडी वगैरे काही नाही. तिच्यावर कुल-देवतांचा कोप झाला आहे.'

'कुलदेवतेचा कोप व्हायला तिने केले आहे तरी काय ? मी सांगते. तिला सभेत कोणा मेल्या चांडाळाची दृष्ट लागली आहे.'

'अगऽ हिचे मनच कुणावर तरी गेले असणार.'

'सभेत हिला कोणी तरी उलटून बोलले असेल.'

'कोणी तरी कशाला ? तो रुक्मी आहे ना ? तोच बोलला असणार. त्यानेच ही अशी झाली आहे.'

अशी दासींची चर्चा चालू झाली. राजसभेच्या आत काय झाले होते ते त्यांना माहिती नव्हते. त्यांना आता विवंचना लागली होती की आता राजाला कोणत्या शब्दात निरोप धाडावा ? आत आईला काय सांगून पाठवावे ? की आपले राजवैद्यालाच प्रथम बोलावून त्याला सारे सांगावे ?'

✠ ✠ ✠

४८

## रुक्मिणीचे निवारण

ती चर्चा कानी पडताच ती सुलोचना रुक्मिणी क्षणभर सावरून बसली आणि दृष्टी वर करून म्हणाली,

' तुम्हाला कोणाला असाध्य रोग झाला असेल तर तुम्ही वैद्याकडे जा. तुम्ही माझ्यापेक्षा फार शहाण्या आहात. आता कृपा करून भलत्यासलत्या गोष्टी बाबांना जाऊन सांगू नका. नसते काही तरी आईला सांगून तिलाही दुःख देऊ नका. '

※ ※ ※

४९

## भावकलनेचा तर्क

रुक्मिणीचे हे म्हणणे ऐकून तिची मनकवडी सखी भावकलना इतरांवर रागावून म्हणाली,

' चला, चहाटळांनो बाहेर व्हा. रुक्मिणी किती शिणली आहे ते दिसत नाही काय ? तिला क्षणभर जरा नीज येऊ द्याल की नाही ? '

नंतर तिने रुक्मिणीला रेशमाचा अतिशय तलम असा शेला पांघरविला. सोन-कमळीच्या पाकळ्यांना वजन होऊ न देता जसा सुगंध त्यांना बिलगून रेंगाळत असतो तसा तो शेला अलगदपणे रुक्मिणीला लिपटला. त्याला स्पर्शणारे तिचे अवयव त्यातून आरपार शिरून दिसत आहेत असे वाटू लागले. मग चंद्रिका तिचे पाय मांडीवर घेऊन चुरू लागली. पद्मावती तिला हळूहळू थोपटू लागली. पण रुक्मिणीच्या हृदयाला कृष्णाच्या विरहाची जी व्यथा जाळीत होती तिला काही उतार म्हणून पडेना. तिचा डोळा लागेना. तिची तळमळ वाढूच लागली. तेव्हा भावकलनेला वाटले,

' हिची व्यथा काही साधारण दिसत नाही. हिला दुसरे काय झाले असेल असे मला वाटत नाही. राजाजवळ ही बसली असता किन्नराने जेव्हा राजांचे वर्णन केले तेव्हा बहुधा मन्मथनाथ कृष्ण हिच्या चित्तात शिरून मुक्कामाला आला आहे, असे हे लक्षण दिसत आहे. आता हिला ही गोष्ट स्पष्टपणे विचारावी तर ती मुग्धपणाने

लाजून संकोचेल आणि स्वतःच्या शहाणपणाने भलतेच काही तरी सांगून आम्हाला झुलवील. त्यापेक्षा असे केलेले बरे. विरहाचे उपचार हिच्यावर करावयास सुरुवात करावी. म्हणजे तिच्या मनाची अवस्था आपोआपच निश्चित होईल.'

असे ठरवून त्या बुद्धिवान प्रधानकन्येने उचितचंद्रिकेला जवळ बोलाविले आणि ती तिला खुणांनी म्हणाली,

'सखे, पाण्याचे शीतलोपचार करणारे धारादामोदर तू चालू कर बघू.'

मुख्य सखीने दिलेला तो आदेश ऐकून उचितचंद्रिका त्या व्यवस्थेला लागली. धारादामोदराच्या उपचारांची रचना कशी होती हे आता नरेन्द्र कवी सांगणार आहे. हे ऐकून रसिकाच्या मनाला खात्रीने वेध लागतील.

* * *

५०

## धारादामोदर

हे धारादामोदर चंद्रकान्त मण्यांच्या मोठ्या चौरस बांधलेल्या खालोटीत रचलेले होते. विहिरीसारख्या खोल असलेल्या या जागेत पटांगणे, कालवे, कुंज यांची रचना केलेली होती, आणि त्यांत पाण्याच्या यंत्रावर चालणारे हिमशीतल असे धारादामोदर रचलेले होते. हिमनदीतील गोठलेल्या बर्फाचे रेखीव चिरे काढून त्यांची रचना केली होती आणि त्यातून हिमशीतल पाणी खेळविले होते. बर्फखंडाची ती रचना सुंदर तर होतीच. शिवाय चंदनाचा भरपूर उपयोग त्या सोळा खणी इमारतींच्या बांधणीत केला असल्याने ती शीतलता सुगंधितही होती. त्या मंदिरातील खांब ओल्या चंदनाचे होते. चौकटी, पट्ट्या, सज्जे यांची रचना करताना वास्तुकलाशास्त्राची परिसीमा गाठली असल्याने ती शीतलता नयनरम्यही झाली होती. गवाक्षे आणि गच्च्या यांची जागोजाग शास्त्रोक्त रचना केलेली होती. रुक्मिणीला विश्रांती घ्यावयासाठीच त्या स्थलाची रचना केली असल्याने उणीव म्हणून कसली नव्हती. त्या मंदिरातील प्रत्येक भागाचे सौंदर्य केवळ अवर्णनीय होते. उंबरे कृष्णागरु चंदनाचे घोटून बनविलेले होते. दाराची चौकट मदनकेवड्याच्या लाकडांतून कोरून काढलेली होती.

त्या मंदिराच्या वेगवेगळ्या खोल्यांतून वेगवेगळी कलाकुसर योजिलेली होती. दारे एकजात चंदनाचीच होती. तुळयांवर जागोजागी नाना प्रकारच्या नृत्यमुद्रांत आकारलेल्या

झाल्यावर शिशुपालाला बोलाविण्याचे ठरले आणि त्या कामाचा आदेश कोशाधिकारी रत्नशेखर याला देण्यात आला. नंतर पृथ्वीवरील इतरही सर्व राजांना आमंत्रणे पाठविण्याची व ऋषीमुनींना आदराने बोलावून आणण्याची व्यवस्था केली गेली.

✠ ✠ ✠

## ४३

### रुक्मिणीचा शीण

इकडे रुक्मिणीची अवस्था वेगळीच झाली होती. किन्नराने केलेले कृष्णाचे वर्णन ऐकून तिला त्याचे वेध लागले होते. ती विरहाने व्याकुळ झालेली होती व पाण्याशिवाय सुकून गेलेल्या कल्पलतेप्रमाणे कोमेजून गेली होती. जो तिच्या मनात भरला होता त्या श्रीकृष्णाला बाजूला सारून रुक्मीने चांडाळ शिशुपालाची भलावण चालविली होती. त्यामुळे तिला जो शीण होत होता तो कुठे बोलताही येत नव्हता. कोमल कमलिनी असावी, 'ती सूर्याच्या उष्णतेने उकडून जावी, त्यात आणि तिच्यावर चिखल उपडा व्हावा, आणि नंतर भोवती वणवा पेटावा तशी त्या बिचारीची अवस्था झाली होती.

✠ ✠ ✠

## ४४

### रुक्मिणीची विरहावस्था

परंतु त्या अवस्थेकडे कुणाचे लक्ष नव्हते. तिला शिशुपालाला देऊ केली आहे अशी घोषणा करून भीमकाने तिला राजवाड्यात जावयास सांगितले होते. ती बिचारी निघाली खरी. पण तिला उभे राहण्याचेही भान नव्हते. तिची अवस्था पाहून सख्यांनी तिच्यासाठी पालखी आणली आणि मग मैत्रिणींचा आधार घेऊन ती कशीबशी त्या

उभा करीत. अशाच वर्तुळाकार उडणाऱ्या धारांचे मांडव जागोजागी तयार होत. मग त्या धारा एकमेकांवर आपटून फुटत आणि बारिक तुषारांचा पाऊस पडे. कारंजांच्या भिंती, कारंजांचेच छप्पर यांनी अनेक तऱ्हेच्या राहुट्या जागोजागी उभ्या रहात आणि ते पाण्याचे शीतलोपचारगृह मनाला सुगंधी भुलीत वेडावून टाकी. कमळांच्या कळ्यांची कळसासारखी रचना जागोजाग उभविली होती. त्यामधून चांदण्यासारख्या पांढऱ्या शुभ्र रंगाचे हंस सोनकेवड्याच्या लाकडातून कोरून ठेविले होते. कोवळ्या मोत्यांच्या शंखाकार कळसात जुळलेल्या झालरी ठायी ठायी लोंबत होत्या. शीतलोपचारासाठी निर्मिलेले ते मंदिर सर्वांगीण अशा धवल शीतलतेच्या अनुभूतीमुळे चंद्रलोकालाही मागे सारीत होते.

भीमक राजाने ते मंदिर रुक्मिणीच्या वसंतविहारासाठी खास बनविले होते. जणू स्वर्गातील मंदाकिनीचे वैभवच जिंकून त्याने त्याच्या लाडक्या लेकीसाठी ते पृथ्वीवर आणलेले होते. हिमालयातील एखादे कोरलेले लेणे असावे, अथवा जलराज वरुणाचे हिमातून कातून काढलेले वैभवशीतल विमान असावे, किंवा मेघराजाने स्वतःसाठी राज-मंदिर बांधलेले असावे तसे ते शीतमंदिर दिसत होते. किंवा असे वाटत होते की, भूमी-वरील सरोवरांचे सौंदर्यभांडारच इथे एकवटले आहे; किंवा महानदी जी गंगा तिचेच हे सुखविलासस्थान आहे; किंबहुना त्रैलोक्यातील सारी सुखे ज्यात सामावलेली आहेत असा तो सुखाचा पूर्णकलशच आहे.

सुगंधांनी सदा कोंदलेले ते मंदिर जणू सुगंध दाटवून त्याचेच घडलेले आहे असा भास होत असे. असे वाटे की हे मंदिर म्हणजे मदनाचे सिंहासनच आहे; किंवा तो चंद्राच्या सोळाच्या सोळा कलांनी रचिलेला विलासकुंज आहे. थंडगार अशा त्या शीत-मंदिराच्या सदा ओल्या भिंतींवरून सूर्यप्रकाश झळाळे तो पाहून असे वाटे की सूर्याला त्या मंदिराच्या दर्शनाने हीव भरलेले आहे आणि तो थरथरा कापत आहे. आकाश गडगडे तो आवाज ऐकून वाटे की विजेला या मंदिराच्या थंडाईमुळे थंडी वाजत आहे आणि त्यामुळे तिचे दातच एकमेकांवर आपटत आहेत, ज्या खोलगटीत हे मंदिर होते तिच्यावर बाहेर चहूकडे कापुर-केळीचे खांब रोवलेले होते. त्यावर चारी दिशांनी द्राक्षाच्या वेली चढविल्या होत्या. सोळा खणाच्या त्या मंदिरातून जिथवर दृष्टी फाके तिथवर नयन-रम्य असे द्राक्षांचे घड लोंबताना दिसत.

भावकलनेची आज्ञा मिळताच उचितचंद्रिका त्या दामोदराकडे आली आणि तिने तेथील सारी यंत्ररचना चालू केली. नंतर तिने पाय धुतले व ती पुन्हा रुक्मिणीच्या शय्याघरात गेली.

✠ ✠ ✠

५१

## भावकलनेची विनंती

तेव्हा भावकलना रुक्मिणीला म्हणाली,

‘ सखे, तुला कशामुळे इतका शीण येत आहे ? तुला नीज का ग येत नाही ? तुझे अंग तरी किती रसरसले आहे आणि चेहराही अगदी उतरून गेला आहे. चंद्रकान्त मण्याचे घडविलेले तुझे हे शेजघर म्हणजे जणू हिमालयाची शीतल गुहाच. पण तुझ्या अंगीच्या उष्णतेने या शय्यामंदिराच्या भिंतीही वितळू लागल्या आहेत. मला वाटते या रतिमंदिरात राहून तुझ्या अंगीची धग वाढतच आहे. चल आपण धारादामोदरात जाऊ. येतेस का ? ’

* * *

५२

## रुक्मिणीची अवस्था

भावकलनेचे म्हणणे रुक्मिणीने मान्य केले. नंतर पद्मावतीने तिच्या डोळ्यांना पाणी लावून ते ओले केले. नंतर तिला आपल्या अंगाचाच आधार देऊन बसती केली. मग रुक्मिणीने क्षणभर श्वास घेतला आणि मोठे अवसान धरून ती म्हणाली,

‘ वैरी होऊन आलेला हा मेला दिवस संपणार तरी कधी ? ’

आता सांजवेळ जवळ आली होती. चोहीकडे रत्नाचे दिवे लावलेले होते. पण त्याच्या प्रकाशाची तिरीप त्या विरहिणीला सहन होत नव्हती. अंगीची सर्व शक्ती एकवटून ती कशीबशी उठली. तेव्हा मदनाच्या मूर्तीसारख्या सुंदर दिसणाऱ्या भावकलनेने तिला आधार दिला. रुक्मिणीचे पाय अगदी लुळे पडले होते. तिचा सगळीकडून तोल जात होता. तिचे डोळेही नीट उघडणे तिला शक्य होत नव्हते. आणि विरहाच्या झापडीने तिची मानही एका बाजूला कलंडली होती. ती आता पडणार असे दिसताच भावकलनेने तिला वरच्यावर सावरले. सख्यांचा मोठा गलबला झाला. त्या तिला दोन्हींकडून वारा घालू लागल्या. सख्यांच्या या सेवेने रुक्मिणीची ग्लानी क्षणभराने उतरली. नंतर कशी-बशी चाचपडत आणि तोल सांभाळीत ती आपल्याच पायांनी धारादामोदराकडे जावयास

निघाली. उंबऱ्याबाहेर पाऊल टाकताच सख्यांनी तिला चहूकडून आधार देऊन सावरली. इथे थोडा अधिक उजेड होता आणि त्यामुळे रुक्मिणीची कोळप अधिक स्पष्ट होत होती. विरहाच्या तापामुळे वादळात पान थरथरावे तशी ती कापत होती. तिचा जिथे जिथे पाय पडत होता तिथे तिथे तिच्या पावलाच्या उष्णतेने पायतळची स्फटिकभूमी करपत होती. खरे म्हणजे तिच्या पावलांच्या त्या धगीने खालचे पाताळच तापत होते तेथे भूमी करपली तर त्यात नवल ते काय ?

रुक्मिणीने नुसते श्रीकृष्णाचे वर्णन तेवढे ऐकले होते. परंतु त्यानेच तिला लागलेली ओढ एवढी जबरी होती की, तिच्या विरहाच्या धगीने पोळून तिच्या अंगावरील अलंकारांतील मोत्यांच्या नुसत्या लाह्या झाल्या होत्या. ती उकलून गेलेली मोत्यांची भूषणे रुक्मिणीस जाचू लागली तेव्हा सख्यांनी ती उतरली आणि थंडगार कापराची बनविलेली नवी भूषणे तिला चढविली. तो, ती तर पहाता पहाता सुरकन जळूनच गेली तेव्हा सख्यांनी कमलांच्या कळ्यांची भूषणे बनवून ती तिला लेवविली. सुकुमार अशा त्या राजकुमारीची एकंदर अवस्था पाहून सख्यांनी ओळखले की हिला काही धारादामोदरा-पर्यंत चालणे शक्य नाही. तेव्हा त्यांनी तिच्यासाठी तिथल्या तिथे अतिशय मृदुमवाळ अशी डोली बनविली.

ती डोली गुळउसाची केली होती. नवारीच्या जागी तिच्यात केतकीच्या मृदु-सुगंधी पाकळ्या विणल्या होत्या. बैठक अशोकाच्या कोवळ्या पानांची केली होती. दोराचे सारे बांधकाम कमळांच्या देठांचे बनविले होते. चाफ्याच्या फुलातील पराग जमा करून त्यांची उशी बनविली होती. अशी डोली तयार होताच सख्यांनी रुक्मिणीला त्या उशीला टेकून बसविली. तेव्हा चंद्राला टेकून बसणाऱ्या कुंकुमकेशराच्या हरिणीसारखी ती शोभू लागली. मग त्यांनी तिच्या मस्तकावर वाळ्याचे छत धरले. लवंगीच्या कोवळ्या कळ्यांची रास तिच्या शरीराला आधार होईल अशी पसरली आणि मग त्या नाजूक डोलीची कोवळी दांडी उचलून भोयाचे काम करणाऱ्या दासी चालू लागल्या. त्या डोळकरणी जपून चालल्या होत्याच. तरीही त्यांना ' नीट. नीट. सांभाळून. ' अशा सूचना एकसारख्या देत दोन्ही बाजूंनी सख्या चालल्या होत्या.

जपून चालत, पण शक्य तेवढी लौकर डोली धारादामोदराकडे आणली गेली. तेथे रुक्मिणीला बसण्यासाठी कापुरकेळीचा झोपाळा बांधलेला होता. त्याचा पाट कमळाचा तंतूंच्या आडव्या-उभ्या विणीने घडविला होता. सोनकमळीच्या नळ्यांचा गोफ गुंफून त्यांनी तो टांगता ठेवला होता. त्यावर सगळीकडे फुलांतील सुगंधी मकरंद लिंपून त्याला ओलावा आणलेला होता. कमलांच्या पाकळ्यांची दाट मऊ बैठक त्यावर पसरली होती. सख्यांनी सांभाळून आणून रुक्मिणीला त्या झोपाळ्यावर बसविली.

रुक्मिणी पालखीत बसून दमली असेल म्हणून तिला सख्यांनी शीतसुगंधी सुखा-सनावर बसविले, पण रुक्मिणीला मात्र वडवानळाच्या ज्वाळांत सापडलेल्या चंद्रावरील

हरिणासारखे वाटू लागले. मेघाच्या दर्शनाला आतुर झालेली चातकी आर्ततेने जळते तशी रुक्मिणी विरहाच्या विजेने नुसती पोळून निघत होती. प्रियकरापासून रात्री दुरावलेली चक्रवाकी जळत असते तशी ती रुक्मिणी कृष्णविरहाच्या वणव्यात होरपळत होती. बिचाऱ्या चंद्राला आधीच क्षयाची व्यथा असते आणि त्यात राहू त्याच्यावर हल्ला करण्यासाठी टपलेला असतो म्हणून तो भीत असतो; लोणार येथील मन्दाकिनीची पवित्र तीर्थधारा आधीच उन्हाळ्याने आटत असते आणि त्यात चांडाळ लोक तिच्यात विटाळ कालवून तिला कष्टवीत असतात, म्हणून ती धार थरथर कापते. तशी ती चंद्रवदना रुक्मिणी आधीच आटलेल्या जलधारेप्रमाणे क्षीण झाली होती, आणि त्यात विरहाचा ताप वाढत होता. म्हणून ती भिऊन थरथरत होती. कृष्णाचा वियोग होणार म्हणून तर ती दीन झाली होतीच. शिवाय राहूसारख्या चांडाळ आणि दुष्ट शिशुपालाचा स्पर्श होणार म्हणूनही ती भेदरली होती. आतल्या आगीची धग तिच्या सर्वांगांना जाळीत होती. तिचा चेहरा क्षणोक्षणी सुकत चाललेला होता. आजच निश्चयाने आपले मरण आलेले आहे असे तिला वाटत होते.

✠ ✠ ✠

५३

## सूर्यास्ताचे वर्णन

रुक्मिणीची ही अवस्था पाहून तिचे लक्ष दुसरीकडे वेधण्यासाठी उचित-चंद्रिका म्हणाली,

‘ सखे, अस्ताचलाकडे वळलेला सूर्य किती सुंदर दिसत आहे पहा. पोवळ्याच्या मंदिरात तेजाची रास सजविलेली असावी तसे वाटत आहे. नाही का ? वासनांनी वेडा झालेला शृंगारपक्षी केशर-कुंकुमाच्या विलासवनात जाण्यासाठी झेपवावा तसा सूर्य दिसत आहे. नाही ? किंवा शंकराने पोळलेला मदनच थंडाईसाठी पश्चिम समुद्रात शिरत आहे असे दिसत आहे. नाही का ? प्रकाशाचा गोळाच घरंगळत चालला आहे, किंवा आकाश लंघणारा गरुड मुक्कामासाठी पाताळात शिरत आहे असे नाही का तुला वाटत ? की गालांवर कमलाची लालुस कांती आणून ही पश्चिम दिशा श्रीकृष्णाची विलासपूजाच बांधण्यासाठी सजली आहे असे तुला वाटते ? अस्ताचलावर हा सूर्य पाहून मला असे वाटत आहे की या संध्यारंगाच्या सरोवरात लाडक्या हंसीचा शोध करण्यासाठी हा सोन्याचा राजहंस इतक्या लगबगीने चाललेला आहे.

✠ ✠ ✠

५४

## सायंकाळचा अंधकार

' आणि हा हळूहळू माथा उंच करणारा अंधार पाहिलास ? हा कोठे इंद्रनीळ-मण्याला अंकुर फुटत असावेत तसा निळा दिसत आहे; तर कुठे गरुडाच्या मुखातून बाहेर उमळलेल्या पाचूच्या पर्वतासारखा हिरवा दिसत आहे. कुठे कस्तुरीच्या माजलेल्या मेघासारखा दाट काळा दिसत आहे तर कुठे गगनरूपी निळया पक्षिणीच्या अंड्यातून जन्म घेणाऱ्या पिल्लासारखा आकाशी दिसत आहे. की हा श्रीकृष्णाचा निळा वर्णच गंगेचे रूप घेऊन ब्रह्मांड भरून टाकण्यासाठी पुढे सरत आहे ? रुक्मिणी, इकडे पहा. निळ्या तमालवृक्षाचे वनच बहराला यावे तसे इकडे दिसत आहे. इकडे एखाद्या मोठाल्या धुराड्यातून निघणारा धूर परत जावा तसे वाटत आहे. इथे तर पोलादी वर्णाच्या गाईंचे खिल्लार स्वर्गातून उतरले असावे आणि स्वर्गपृथ्वीच्या अवकाशातील कुरणात ते शेपट्या उधळीत विहरत असावे असे वाटत आहे. इकडे असे वाटत आहे की मदनाचा सेनापती जो वसंत, त्याने कमलांवर बसलेल्या साऱ्या भ्रमरांना उठवून लावलेले आहे आणि भ्रमरांचा तो प्रचंड थवा विरहिणीवर अकस्मात हल्ला करण्यासाठी चाल करून येत आहे. या इकडे पहा. इथे असा भास होत आहे की, आता या भूगोलकाच्या मंचकावर रतीबरोबर मदन जे खेळ खेळणार आहे त्या आधीची संकल्पपूजा म्हणून त्या प्रणय देवतांनी गगनकालीची नीलकमलानी आराधना चालविली आहे त्या निळया पूजा-कमलांची ही रासच क्षणोक्षणी दाटून उंचावत आहे. '

✠ ✠ ✠

५५

## सायंकालीन सृष्टी

तोवर सायंकाळ पुढारला होता. सारी सूर्यविकासी कमळे मिटली होती. पक्षी ओढीने घरट्याकडे परतले होते. प्रियेच्या विरहात सापडलेले चक्रवाक व्याकुळ झाले होते. सारे राजरस्ते नाना प्रकारच्या फुलांच्या सुगंधाने भरून वहात होते. फुलमाळयांची दुकाने असलेल्या पेठांतून रतिविलासी लोकांनी फुलांच्या खरेदीसाठी दाटी केली होती.

ब्राह्मणांनी संध्यावंदने संपविली होती. कोणी षोडशोपचार देवतापूजने उरकिली होती. अग्निहोत्री लोकांनी अग्नीची उपासना केली होती. व्रती जनांनी त्यांचे मौन सोडले होते. नगरीमधील धनिकांच्या प्रासादातून मंगल वाद्यांचे घोष आणि नृत्यगीतांची आराधना यामुळे प्रत्यक्ष स्वर्गच उतरला आहे, असे वाटत होते. नृत्यांगना आकर्षक शृंगार करून कामुकाची टेहेळणी करीत वाट पहात होत्या. कुंटिणी स्त्रिया अभिसारिकांना घेऊन लगबगीने संकेतस्थानाकडे चालल्या होत्या. रात्र नुसती माजाला आली होती. असे वाटत होते की त्या रात्रीने उजेडालाही आंधळा केल्यामुळेच जणू काय लोकांनी त्या उजेडाला दिव्यात बंदिस्त केले होते आणि त्याला काहीच दिसत नसल्याने ते लोक दिव्याला हातात घेऊन उजेडाला जिथे जायचे असेल तिथे नेत होते.

✠ ✠ ✠

५६

## दिव्यांचे वर्णन

कुलदेवतांपुढे दिवे लागलेले होते. इतरत्रही जागोजागी लाख लाख दिवे फुलले होते. जणू श्रीकृष्णाच्या प्रतापाची ती तेजस्वी निशानेच चोहीकडे संचार करीत होती. किंवा जणू काय सूर्याने जाता जाता ओळखले होते की, अंधार आता उन्मत्त होणार आहे. म्हणून त्याने स्वतः येईतो अंधाराच्या हालचालीवर नजर ठेवण्याकरता हे दिवे म्हणजे पहारेकरीच मागे ठेविले होते. किंवा उद्या जी सूर्यप्रकाशाची सेना येणार होती तिचे आघाडीचे सैनिकच हे दिवे होते व प्रतापी अंधार राजाने त्यांना स्वतःच्या सामर्थ्याने रोखून धरलेले होते. किंवा काळोखाच्या सागराचे जे मंथन नुकतेच सुरू झाले होते. त्यातून वर उसळून आलेली ही पहिलीवहिली माणकेच होती. किंवा असेही वाटत होते की, हे दिवे म्हणजे रात्रीने सांजवेळेवर हल्ला केला आणि तिला पराभूत केले तेव्हा जिंकून आणलेली संध्या रंगाची खंडणीच होती. किंवा माजलेला अंधार आता आकाशावर चालून जात होता म्हणून गर्भिणी वीज घाबरली होती आणि भयाने तिचे अर्धतेजाळ गर्भच जणू गळाले होते.

✠ ✠ ✠

५७

## नक्षत्रे

नंतर एक एक करून आकाशात नक्षत्रे उमटू लागली. जणू काय गगनाच्या उद्यानातील पुष्पकळ्याच उमलू लागल्या. नक्षत्रांच्या उगवण्याच्या परी तरी किती ! कुठे दाटलेले मेघ हळूच दूर होत आणि त्याआडची नक्षत्रे दिसू लागत. वाटे जणू मेघाचा शिंपलाच उघडला आणि ही मोत्यांची वीण ओघळली. कधी असे वाटे की चांदणे पिण्यासाठी आकाशाकडे जाणारे चकोर वाटेत मंदाकिनीच्या जलात आपले पंख धुऊ लागले आणि त्या पंखांना चिकटलेले मंदाकिनीचे हे थेंबच चोहीकडे उडाले. किंवा असे वाटे की आकाशगंगेचा प्रवाहच वहात आहे आणि ही नक्षत्रे म्हणजे त्या प्रवाहातील तेजस्वी बाणलिंगे आहेत.

रुक्मिणी, नक्षत्रांच्या उदयाची ही शोभा पहात होती. तेवढ्यात तिची सखी भारती म्हणाली,

‘ मोहरलेला चंद्र मोठ्या बहराने उगवत आहे. पहा तरी. ’

तेव्हा चंद्राचा जो उदय झाला त्याचे वर्णन आता नरेंद्र कवी करणार आहे. हे वर्णन इतके रसाळ आहे की ते म्हणजे जणू सात समुद्रांत आठव्याची भर घालणारा एक रससमुद्रच आहे.

卐 卐 卐

५८

## चंद्र उगवला

अवस उलटल्यावर जी द्वितीया येते तिचे चांदणे हे नुकत्याच पोसवणाऱ्या कणसा-सारखे असते. मग पंचमी येते आणि चांदण्यांच्या या कणसांत दाणा फुलू लागतो. अष्टमीला हे चांदणे दूधभऱ्या दाण्यांनी आकारते. दशमीला हे दाणे जरा हळवे झाले की चांदण्यावर जगणारी चकोराची कुले ते चांदणे पिऊन आपले नवे साज करतात.

पौर्णिमेचे पूर्ण चंद्रमंडल जेव्हा उदयाचलावर येते तेव्हा जणू चकोरांच्या खळ्यावर चांदण्याच्या पिकाची रासच पडते. असा तो चंद्र पाहून वाटते की चांदण्यांचा समुद्रच मंथिला जात आहे आणि त्यातून लक्ष्मीचा मुखचंद्र वर डोकावत आहे. किंवा देवेंद्राने कृष्णाला धाडलेला अमृताचा नजराणाच जणू तो चंद्र आहे किंवा आकाशाच्या मंडपा वर चंद्रिकेची वेलच विस्तारली आहे व तिला नक्षत्रांची फुले लागली आहेत किंवा अमृताची बीजेच आकाशात रुजून आली आहेत, त्यांची बीजदले हाच चंद्र होय. किंवा आकाशाच्या नितळ शोभेत शुभ्रधवल कैलासाचे प्रतिबिंब पडले आहे तोच हा चंद्र किंवा क्षीरसमुद्राच्या पांढऱ्या दुधात बुचकळलेल्या कापडाचा बनविलेला श्रीकृष्णाच्या कीर्तीचा ध्वजच अस्मानात उंचावला आहे, तोच हा चंद्र !

सारे आसमंत जेव्हा चांदण्याने भरून जाते तेव्हा असे वाटते की आकाशाचा हा घुमट म्हणजे जणू अनंगदेवाचा तालीमखाना आहे. चारी प्रकारच्या शृंगार लीलांचा सराव आपल्या शिष्यांना देण्यासाठी अनंगाने त्या तालीमखान्यात कुटलेल्या कापुराची शीत तेजाळ अशी सुगंधी भुगटीच पसरली आहे. किंवा श्रीकृष्णाची हंसीसारखी विमल कीर्ती ब्रह्मदेवाच्या शुभ्र हंसाशी समागम पावली आहे आणि तिने चंद्ररूपी अंडेच घातलेले आहे. किंवा क्षीरसागरीच्या दुधाला उसळी आलेली आहे; साऱ्या सृष्टीतील रोपांना त्या दुधाचे शिंपण चाललेले आहे आणि चंद्र म्हणजे ते दूध क्षीरसमुद्रातून उचलून भूमीवर ओतावयाचे मापटेच आहे. किंवा सर्वांगाला पाऱ्याची उटी लावून शंकराला जिंकावयास निघताना आकाशीच्या मार्गात कास घालून सिद्ध होणारा मदन, म्हणजेच हा दूधसागर चंद्र आहे. किंवा हा चंद्र म्हणजे आकाशात विस्तारलेली अमृताची वेलच आहे. किंवा मदनाला जीवदान देणारी ती संजीवनी विद्या आहे किंवा तो म्हणजे चांदण्याला पूज्य असणारी त्याची आराध्यदेवता आहे. किंबहुना चंद्र आहेच कुठे ? हे तर द्वारकेचे शुभ्रतेजाळ बेट आहे. मधे सावळे दिसत आहे ते कृष्णाचे बिंब आहे. आणि चांदण्याच्या रूपाने हे वर ऊतू जात आहे ते त्या श्रीकृष्णाचे रूपसौंदर्यच आहे. किंवा भूलोकात जसा पाऱ्याचा आरसा असतो तसा हा आकाशीचा अमृताचा आरसा आहे आणि त्यात प्रतिबिंब पडलेले आहे ते श्रीकृष्णाचे आहे. कलंक कलंक म्हणतात तो कलंक नव्हेच. ती कृष्णाची छाया आहे. किंवा कृष्ण नवरा मिळावा म्हणून प्रार्थना करण्यासाठी स्वर्गातील या तारांगना जमल्या आहेत. त्यांनी मंदाकिनीच्या वाळूची शाळुंका पूजेसाठी बनविली आहे तीच हा चंद्र होय. आणि त्या शाळुंकेवर जी निळी कमळे भक्तीने वाहिली आहेत ती म्हणजेच हा कलंक होय.

* * *

५९

## चंद्राच्या कला

चंद्रविकासी कमले उमलली आहेत. त्यांच्या परागमधूच्या आसनावर सुगंधराज विराजमान झाला आहे. या सुगंधराजाची पूजा चंद्र आपल्या किरणरूप भुजांनी त्याला भ्रमरांची फुले वाहून करीत आहे. या पूजेसाठी चंद्राने जो भ्रमरसमुच्चय जमविला आहे तोच चन्द्रावरील कलंक होय. चंद्रासारखा कुशल कलावंत दुसरा कोणी नाही. एकही बाण न सोडता तो दोन दोन लक्ष्यांचा वेध करतो. एक लक्ष्य म्हणजे चंद्रकान्त मणी. चंद्र उगवताच यातून पाणी पाझरू लागते. दुसरा म्हणजे सागर. चंद्राच्या मदिरेची माधवी अशी काही धुंदमादक आहे की जड समुद्रालाही तिच्या स्पर्शाने जिवंत भरते येते आणि मग तो पृथ्वीसुंदरीला मिठीत ओढून ओली करीत असतो. चंद्रकिरण किल्लीचे रूप घेऊन शिंपल्याचे मंदिर उघडतात आणि मग मेघमालांशी समागम करून मौक्तिकांची बीजे त्या शिंपल्यात रिती करतात, म्हणून तर मोत्यांची उत्पत्ती होते. पोसलेल्या केळींच्या गर्भाशयातील जोमदार नळीनळीत आपल्या सोळाही कलांनी शिरून चंद्र आपल्या धवल यशाचे बी तिथे पेरतो म्हणून तर भूतलावर त्या केळीच्या गाभेबनातून कापूर उत्पन्न होतो. चकोर चांदण्यावरच जगतात. त्यांच्या पवित्र मुखात चांदण्याचा प्रवेश सोपा व्हावा म्हणून चंद्र हे जणू काय एक फुलपात्र बनते. चकोर त्या पात्रातून चांदण्याची मदिरा भरभरून पितात आणि सारी रात्रभर आनंदाने झिंगून डुलत असतात. कोणत्याही तऱ्हेची परतफेड न अपेक्षिता चंद्र आपल्या चांदण्याचा वास करून सृष्टीला असा भरवीत असतो म्हणूनच शंकराने त्याला जागपूर्वक आदराने आपल्या शिरावर आसन दिलेले आहे.

✠ ✠ ✠

६०

## चांदणे

सारी सृष्टी चांदण्यात नहाली म्हणजे असे वाटते की, तिला अमृताची उटीच लागलेली आहे. किंवा हे चांदणे म्हणजे आकाशाच्या सौंदर्याला घातलेली कमलदलांची

गवसणीच आहे. किंवा स्वर्गघरेच्या विलासमंदिराला जोडलेल्या या कापुराच्या खिडक्याच आहेत. किंवा गगनदेवतेने कोवळ्या मृणालतंतूंची मेखला बनवून धारण केली आहे तिची ही प्रभा आहे. किंवा श्रीकृष्णाचे दर्शन घेण्यासाठी क्षीरसागरच आनंदाने दाटून एकवटला आहे. त्याच्या उदरातील नाना रत्नांची परिपक्व प्रभा म्हणजेच हे चांदणे आहे. चांदण्यात फिरणारे हंस हे आकाशगंगेत विहरणाऱ्या राजहंसासारखे दिसतात. असे वाटते की आकाशातून चंद्रबिंबाची वीण प्रसवली जात आहे आणि हे हंस ही ती पिले आहेत. चकोर चांदण्यात आले म्हणजे तेही हंसासारखेच दिसू लागतात. म्हणून तर त्यांच्या जोडप्याला जवळ असूनही एकमेकांची ओळख रात्रीची पटत नाही. चंद्र हा मोठा जादुगार आहे. चांदणे ही त्याची जादू आहे. या जादूची पाखर झाली म्हणजे चंद्रकान्त मण्यांचे पर्वत आणि विशाल क्षीरसागर दिसेनासे होतात. ते चांदण्यात एकरूप झाल्याने वेगळे ओळखू येत नाहीत आणि अंधाराशिवाय भर उजेडात वस्तू लपविण्याचे हस्तलाघव चंद्राला साध्य होते. या चांदण्याचे सौंदर्य असे असते की नक्षत्रासारखी गोरी अंगे ज्यांना लाभलेली असतात त्या कामिनीही चांदण्यापुढे फिक्याच वाटतात. उलट त्या सौंदर्याच्या राज्यात जे कुरूप असेल तेही तलम रेशमी वस्त्राची ओढणी घेतल्यासारखे सुंदर दिसते हे चांदणे म्हणजे—

पण मी सांगू तरी किती? सारखा सांगत राहीन तर ते वर्णन प्रसंगाची मर्यादा ओलांडून जाईल. श्रोत्यांची मने चांदण्याच्या गुणगानापेक्षा रुक्मिणीच्या शीणगानात अधिक रमलेली आहेत. त्यामुळे आता त्या शिणावर जे विरहाचे उपचार झाले त्यांचे वर्णन आधी करावयास हवे.

✠ ✠ ✠

६१

## रुक्मिणीचा टोमणा

भारती म्हणाली होती,

'मोहरलेला चंद्र मोठ्या बहराने उगवत आहे. पहा तरी.'

रुक्मिणीला व्यथा होती विरहाची. सख्या तिचे मन रंजवू पहात होत्या तिला चंद्र आणि चांदणे दाखवून. त्यांच्या त्या वेडेपणाने ती कोपमूढ झाली तर ते योग्यच होते. ती भारतीला म्हणाली,

'मला काय होत आहे आणि त्याला उचित उपाय कोणता हे तुला कळलेले नाही.'

खरे म्हणजे प्रिय व्यक्तीच्या अंतरीच्या व्यथा जिला कळत नाहीत तिचे जीवनच व्यर्थ होय. अशा व्यर्थ माणसे आपणाभोवती आहेत ही जाणीव मोठी अनर्थकर असते. ती कधीही कोणाला होऊ नये. जगात वरवरच्या विचारांच्या मुलाम्याखाली जी माणसे वावरतात तीच सामान्यतः शहाणी मानली जातात. पण रुक्मिणीसारखा जाणता रसिक परीक्षक असेल तर तो खरे शहाणपणा कुठचा आणि मुलामा कुठचा हे ओळखून वरवरच्या दिखाऊ शहाणपणाचे निवारणच करीत असतो.

✠ ✠ ✠

६२

## द्राक्षमंडपातील चंद्रकिरण

रुक्मिणी भारतीला असे सांगत होती तेव्हाही तिकडे इतर सख्या चांदण्याची शोभा पहातच होत्या. द्राक्षवेलीच्या पानांच्या जाळीतून चांदण्यांच्या धारा घुळकन खाली गळत होत्या. चकोर पक्षी आनंदाने उसळ्या मारून त्या धारा गळता गळता वरवरच गिळीत होते. द्राक्षावेलीचे जे मंडप होते त्यांचाही महिरपीतून चकोर, कावळे अशांच्या चोचीचे आकार ठेवलेले होते. त्यांतून चांदण्याच्या बारीक धारा मंडपातळी गळत होत्या. असे वाटत होते की, हा द्राक्षमंडप नव्हे तर मेघपटलच आहे; या चांदण्याच्या धारा नव्हेत तर नवरसांचा पाऊसच पडत आहे. ही सारी शोभा इतर सख्यांना सुखवीत होती. पण विरहातुर रुक्मिणीला मात्र मदनाच्या पिचकारीतून उडणाऱ्या वारेसारख्या वाटणाऱ्या त्या धारा बाणाप्रमाणे व्यथार्त करीत होत्या. रुक्मिणी हीच स्वतः मदनाचे गोरे आणि अमोघ असे शस्त्र होती. त्यामुळे तिलाच व्याकुळ करणाऱ्या त्या सुधाधारा मदनापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी कुणी मनोजयी वीराने बांधलेल्या मोर्च्यासारख्या वाटत होत्या.

✠ ✠ ✠

६३

## रुक्मिणीची तगमग

चंद्रकिरणांची ती शोभा वाढू लागली तशी रुक्मिणीची तगमग चढू लागली. ती म्हणाली,

' हा वडवानळ क्षीराब्धीत माझ्या बरोबरच होता. तो आता पाठ सोडीत नाही असे दिसते. त्यातही आश्चर्याची गोष्ट अशी की आकाशात कुठे मेघ दिसत नाहीत, पण ही पूर्णचंद्राकार वाटोळी वीज तळमळत आहे. माझ्याही शरीराच्या पोकळीत मेघवर्ण कृष्णाचा पत्ताही नाही म्हणून विजेसारखी दाहक अशी ही आग मला जाळीत आहे. की वसंत ऋतूचे दिवस असल्याने त्याचे स्वागत करण्यासाठी मदनाने माझ्या सर्वांगाचीच जी होळी पेटविलेली आहे, तीच माझ्या अंगाला पोळत आहे? आणि मदन जी धुळवड खेळत आहे तिचीच धूळ ही चांदण्याचे रूप घेऊन उसळत आहे ? '

आधीच बिचारी रुक्मिणी विरहाने व्याकुळ झाली होती. त्यात आणखी आता चंद्रकिरणांचे बाण तिच्या अंगात शिरू लागले. त्यात आणखी वारा आला आणि कुणी न वाजविताच वेणूवनातील वाद्ये वाजू लागली. शीतगृहाच्या खणाखणांतून असणाऱ्या वाद्यांतून वाऱ्याच्या फुंकीने सात सुरांचे आलाप उमटू लागले आणि रुक्मिणीच्या कानातून शिरून ते तिला शस्त्राप्रमाणे सलू लागले. कलहंसांच्या कलरवांनाही क्षणोक्षणी लाजविणारे ते सूर रुक्मिणीच्या कानाला तापदायक होऊ लागले आणि ती क्षणोक्षणी चमकू लागली. राजहंस पाहून ती अंग काढू लागली. चकोर आणि चक्रवाक यांना पाहून चपापू लागली. सुवर्णगौर हंसाच्या शब्दाशब्दाबरोबर भूतसंचार झाल्याप्रमाणे घाबरू लागली. कस्तुरीमृगाच्या नुसत्या सावलीलाही बघून ती भांबावू लागली. भुंग्यांचा गुंजारव ऐकून तिला कसेसे होऊ लागले आणि कोकिळांचे आलाप ऐकून तर तिला मूर्च्छाच येऊ लागली. साळुंक्या आणि पोपट नेहमी पढविलेले लाडीक अर्थाचे श्लोक गाऊ लागले तर आता त्याच श्लोकांतील रम्यार्थ एखाद्या मारक मंत्राप्रमाणे तिच्या अंगातील विरहाचे विष कालवू लागला. तिच्या मुखांतून प्रदीर्घ उष्ण श्वास निघत होते. जणू त्या फुंकरीने तिचाच विरहाग्नी पुन्हा उजळत होता आणि पुन्हा तो तिच्या अवयवांचे नंदनवन जाळून टाकीत होता. त्या धगीने तिचे सर्वांग अतिशय विकल झालेले होते. धारादामोदरही त्या धगीने जागोजागी वितळत होते. तिच्या सख्याही तिच्यावर एकामागून एक विरहोपचार करीत होत्या. नरेन्द्र कवी आता या उपचारांचे वर्णन करीत आहे. रसिकांनी सादर रहावे.

✠ ✠ ✠

६४

## विरहोपचार

रुक्मिणीची सुगंधा नावाची मैत्रीण होती तिला मंत्रसिद्धी झालेली होती. तिने आपल्या मंत्राचा प्रयोग केला आणि जसा पूर्वकाली मारुतीने लक्ष्मणासाठी द्रोणागिरी उचलून आणला तसा रुक्मिणीसाठी मलयाचल आकर्षून आणला. अमृतच सुगंध ओतीत अंकुरावे तसे या मलयाचलावर चंदन मोहरले होते. त्या चंदनाच्या सुगंधाचा उपयोग सुगंधेने केला. आश्विनातील थंड आणि ओल्या चांदण्यात न्हाल्यामुळे सारा मलयाचल रसधारांनी ओसंडत होता. त्या धारांतून विकसित झालेली टपोर कमळे म्हणजेच जणू ते गंधबहुल चंदनवृक्ष होते. सुगंधेने त्या चंदनाचा सुगंधी अर्क काढला. त्यात चांदण्याचे सत्व काढून मिसळले. मग कापुराचे सत्त्व निवडून त्यात ओतले आणि साऱ्याला पुष्कर रत्नाचे पाणी दिले. आणि नंतर या अंगरागाचा थंड लेप रुक्मिणीच्या सर्व अंगाला लावला. पण तिचा संताप काही कमी होईना, उलट तिची डोकेदुखी मात्र वाढली आणि अंगे अधिकच थरथरू लागली.

तेव्हा कुणी नागरमोथा, मालती, कमले, अशोक, चंदन, बकुळ या सर्वांपासून बनविलेले षडरसयुक्त शीतपेय, त्यात फुलातील मकरंद मिसळून तिला पाजले, तो त्याने तिचे ओठ एकाएकी पोळूनच गेले. केशर, कस्तुरी, चंदनपालवी आणि सुगंधी फुले याचा लेप करून कुणी तिच्या डोकेदुखीवर उतारा म्हणून लावला. तो तिच्यापुढे अंधारीच येऊ लागली. चांदणे अंगावर पडले म्हणजे केळी आपल्या गाभ्याने त्यातील सत्त्व तेवढे शोषून घेत असतात. हे ओले सत्त्व मलयवायूच्या झुळुकांनी हळकून सुकून जाते, तसा त्याचा कापूर बनत जातो. महिनाभर अवधी गेला म्हणजे या सत्त्वाचे चिकाळ थेंब आकारलेले असतात. अजून त्यांचे कण झालेले नसतात पण त्याला सुगंध मात्र आलेला असतो. हा अर्धवट कापूर म्हणजे जणू चिकाळ ओले चांदणेच दाटलेले असते. ते अदमुरे कापुरपाणी अग्नीत टाकले तरी अग्नी थंडगार होतो. पण तेच कापुर-पाणी आता रुक्मिणीला दिले तर त्याचा भलताच परिणाम झाला. त्रिपुरी पौर्णिमेला दीपमाळ जळत असावी तशी तिची सारी इंद्रिये आगीने पाजळून जळू लागली.

कमळाच्या पाकळ्यांना जेव्हा चंद्रकिरणांचा स्पर्श होतो तेव्हा त्या पाकळ्या मोहरतात आणि त्यातून अमृत पाझरते. हे कुणाला कळत नाही, पण पहाटेच्या प्रहरी साखरेच्या कणासारखे दिसणारे या अमृताचे हिमकण पाकळी-पाकळीवर दाटतात. या अमृताला कुमुदकंद असे म्हणतात. असे कुमुदकंद सख्यांनी जमविले. मग चकोरीच्या डोळ्यांत मधुकर्पुराचे अंजन घातल्यावर त्यातून जी आसवे गळू लागली ती जमा केली

आणि त्या आसवांत ते अमृतकणाचे कुमुदकंद खलले. आणि मग चंद्रिकामंत्र म्हणून ते रसायन रुक्मिणीच्या तळव्यांना चोळले. कुणी सखीने चंद्रकिरणांतून गळणारे दूध फुलपात्रात जमा केले आणि नंतर ते कमलिनीच्या कळीत ओतून रुक्मिणीला पाजले. हे औषध खरे म्हणजे रामबाण होते. मागे शंकराने विष घेतले होते तेव्हा होणारा त्याचा दाह याच औषधाने शमला होता. परंतु तेच औषध रुक्मिणीला दिले असता आता उलटून विषासारखे झाले आणि तिच्या अंगीची आग अधिकच वाढून तिच्या नाकातून उष्णतेच्या ज्वाळा निघू लागल्या.

रुक्मिणीला जाचणारी विरहाची आग शेवटी इतकी वाढली की, तिच्या अंगाला अगुरू चंदनाचा लेप केला तर तत्क्षणी त्याचा धुराचा लोट होऊन तिच्या नाकपुड्यांतून निघू लागला. तेव्हा सख्यांनी अनेक प्रकारच्या फुलांचे गंधभरे अर्क काढले. नंतर विद्याधरीकडून जाणकारीने आगविलेले हिमतुषार त्यात मिसळले आणि नंतर त्या अर्कांनी पिचकाऱ्या भरून त्यांच्या धारांनी रुक्मिणीला ओले केले. चंदनाची ओली कोवळी पालवी खुडून त्या पालवीचे पंखे विणले आणि त्यांतून जाई-जुईंच्या कळ्यांचे विणकाम केले. नंतर ते पंखे हिमजलात बुडवून त्यांनी रुक्मिणीला वारा घातला. तरी रुक्मिणीला चैन म्हणून पडेना. असह्य तळमळीने तिला शयनावरच क्षणोक्षणी मूर्च्छा येऊ लागली.

सख्या उपाय शोधीतच होत्या. चांदण्यातून जे अमृत गळत असते ते स्वातीचे मेघ पिऊन घेतात. नंतर या स्वातीच्या मेघांचा पाऊस पडतो तेव्हा ते अमृत शिंपल्याच्या गर्भात शिरते. सात दिवस गेले म्हणजे या शिंपल्याच्या संपुष्टात अधमुऱ्या दह्यासारखी मऊ लुसलुशीत अशी थंडगार अर्धमौक्तिके तयार होतात. सख्यांनी त्या मोत्यांचे थंडगार सार पिळून काढले आणि ते रुक्मिणीच्या हातापायांना आणि टाळूवर जिरविले. परंतु तिचा ताप काही हटेना. कुमुदांतील सुगंध सांडून सांडून दाटलेला मकरंद घेऊन सख्यांनी तिच्या नाकाला चोळला पण तिचा भ्रम काही कमी होईना. सोनकमळीची कोवळी वेल मोत्यासारख्या दिसणाऱ्या दवाच्या बिंदूंनी मोहरून जावी तसे रुक्मिणीचे सारे अंग स्वेदबिंदूंनी डवरून निघाले. कमळाच्या केसराचे परागकण आणि मदन-केवड्याच्या कणसाचे गंधरज यांचा अंगराग करून सख्या तिच्या अंगाला पुन्हा पुन्हा चोळू लागल्या, पण तिचा घाम काही आटेना.

सख्या सारे थंड उपचारच करीत होत्या. पण रुक्मिणीला त्या उपचारांचा कंटाळा येत होता. चंद्र, चंदन, कापूर या साऱ्या थंड गोष्टी तिला पंचाग्नीसारख्या दाहक वाटत होत्या. रुक्मिणीच्या अंगाची त्वचा तर या उपचारांनी सोलूनच निघाली होती. पण तिच्या अंगच्या उष्णतेने तिच्यावर उपचार करणाऱ्या सख्यांनाही दरदरून घाम सुटला होता. रुक्मिणीला कसले सुख म्हणून जाणवत नव्हते. तिला विरहाने नुसते वेड लागायास आले होते. अधिक अधिक उपचार होत होते. तशी तिची अशक्तता अधिकाधिक

## ४०

## भीमकाचा विचार

किन्नराचा तो संगीताचा कार्यक्रम ऐकून सभा आश्चर्याने थक्क झाली होती. तिच्याकडे पाहून भीमक अमात्याला म्हणाला,

" आता तुम्हाला माझ्या मुलीसाठी नवरा शोधावयाची जरूर नाही. आमचे पुण्य थोर. त्यामुळे हा किन्नर दारात चालत आला आणि त्याने भूमंडळावरील साऱ्या क्षत्रियांचे वर्णन केले. किन्नर त्या राजांचे वर्णन करीत होता. तेव्हा त्यातील कोणीच भीमकीच्या मनाला रुचत नव्हता. परंतु त्याने श्रीकृष्णाच्या रूपाचे वर्णन सुरू करताच ती उल्हासाने फुलून एकदम उन्मुख झाली हे तुम्ही पाहिलेच आहे. अर्थात आता श्रीकृष्ण सोडून दुसरा वर शोधण्याची आवश्यकता नाही. आता प्रश्न एवढाच आहे की, आपण ती कृष्णाला देऊ म्हटले तर तो तिचा स्वीकार करील की नाही हे समजत नाही. ती तर इतर कुणाशीही विवाह करून कोणत्याही परिस्थितीत संतुष्ट होणार नाही हेही तेवढेच निश्चित आहे. "

✠ ✠ ✠

## ४१

## रुक्मीची कृष्ण-निन्दा

भीमक एकीकडे असे बोलत होता. त्याचा मोठा मुलगा रुक्मी हा तिथेच राजसभेत होता. हा शिशुपालाचा मित्र आणि कृष्णाचा शत्रू होता. त्यामुळे कृष्णस्मरणाने फुलणाऱ्या रुक्मिणीच्या मनोकमलाला शोकाने मिटवून टाकणारा तो जणू प्रदोषकालच होता. वस्तुतः रुक्मी हा मोठा दाता होता. याचक मुका असला, त्याला मागणी करता येत नसली तरीही रुक्मी त्याची पात्रता पाहून त्याला संपूर्ण मेरू पर्वताचेही दान करीत असे. असे असूनही त्याने कल्याणकीर्तीचा मुळीच सत्कार केला नव्हता. कारण कृष्णद्वेषाच्या पाखंडाने त्याला व्यापलेले होते आणि कल्याणकीर्तीच्या अनुचरात कृष्णभक्तांचा तांडा होता. भीमकाने कृष्णास रुक्मिणी देण्याचा निर्णय बोलून दाखविला तेव्हा रुक्मीला कुत्सित हसू आले आणि तो म्हणाला,

६५

## विरहावस्थेचा चढ

ईश्वराची ओढ जेव्हा अतिशय जाणवू लागते तेव्हा सप्तसमुद्रालाही कढ येतात. या ओढीपुढे उपचारांचा पाड लागणे कठीणच असते. परंतु निदान जिवाची तरी आशा असते. रुक्मिणीला कृष्णाच्या विरहाची व्यथा जाळीत होती. त्यात आणि शिशुपाळाशी विवाह करण्याचा फुफाटा मिसळला होता. त्यामुळे जो त्रास होत होता तो केवळ अवर्ण-नीयच होता. तिच्या जिवाचीच आशा त्याने सुटलेली होती. किन्नराने मोठ्या भक्तीने कृष्णाचे वर्णन केले तेव्हा रुक्मिणीच्या मनात जी ओढ बळावली ती वज्रकवचाप्रमाणे एकाएकी अभेद्य झाली. तिच्यावर विरहोपचाराची मात्रा काही चालेना. जसजशा सख्या तिला वारा घालू लागल्या तसतशा त्या वाऱ्याने रुक्मिणीच्या अंगाला लाविलेल्या चंदनाच्या सुकून खपल्या होऊ लागल्या आणि तिच्या अंगातून बाहेर पडणाऱ्या उकळत्या घर्मबिंदूचे इंधन घेऊन त्या खपल्या आगीसारख्या जळू लागल्या.

* * *

६६

## रुक्मिणीची भीती

तेव्हा भारती म्हणाली,

“ थांबा. थांबा. या रुक्मिणीला तिच्या देहाचेही भान उरलेले नाही. आता आंघोळ पुरी करा व तिला आत अंथरुणावर घेऊन जा. ”

तेव्हा सख्यांनी रुक्मिणीला आत नेली आणि कस्तुरी घोळून तयार केलेल्या ओवरीत केशराच्या बनविलेल्या मंचकावर चांदण्यांची शय्या पसरून तिला त्या शय्येवर निजविली. तेव्हा रुक्मिणीने डावा हात उशाला घेतला आणि उजवा हात आपल्या छातीवर ठेवला. जणू हृदयात लपवून ठेवलेला कृष्ण निसटून जाऊ नये म्हणून ती काळजी घेत होती. शीतोपचारांची तिने दहशतच घेतली होती. तिला सगळीकडे शीतोपचार दिसत होते. स्वतःच्या हाताची बोटे या आम्रमंजिऱ्या आहेत असा भास होऊन ती दचकत होती. तर आपले हात हेच चंद्रकमले आहेत असा [illegible] तिला

भीती वाटत होती. तिचा निःश्वास तिला क्षणोक्षणी मलयानिलाचा आभास जाणवीत होता. तेव्हा सख्यांनी केळीच्या गाभ्याभोवतालीची थंड आणि मऊ अशी सोपटे सोलून काढली, ती सोपटे त्यांनी कापुराच्या पाण्यात भिजविली. नंतर त्यावर अधमुऱ्या मोत्यांचा हळुवार लेप दिला आणि थंडगार काल्याचा शेला रुक्मिणीला पांघरिला. परंतु उकळत्या तेलावर टाकलेला जलबिंदु जसा झटपट जळून जातो तसा तो शेला वरच्यावर भुरकन जळून गेला. असे वाटले की अग्नी जणू मदनाला जाळावयास सवकला होता आणि मदनासारख्या मनमोहक दिसणाऱ्या रुक्मिणीला जाळण्यासाठीच त्याने विरहाग्नीचे रूप घेतलेले होते. किंवा असे की रुक्मिणीच्या मंगल रूपावर शिशुपालाची पापदृष्टी पडल्यामुळे जो कलंक त्या रूपाच्या कीर्तीत मिसळला होता तो कलंक जाळून रुक्मिणीला कृष्णासाठी शुद्ध करण्याचे कामच हा विरहाग्नी करीत होता.

* * *

६७

## सख्यांचे रोगनिदान

थंडीचे उपचार करता करता रुक्मिणी अधिकाधिक असावध होऊ लागली तेव्हा सख्या आपसात हळूहळू बोलू लागल्या.

‘ हिला बहुतेक प्रेमाची बाधा झालेली आहे. ’

‘ हिच्या एकाच स्वराने संगीतातील सातही स्वरांना लाजविले होते म्हणून त्यांनी कोकिळांना लाच देऊन फितविले आहे. आणि त्यामुळेच या कोकिळा सारखा पंचम गाऊन हिला छळीत आहेत. ’

‘ हिच्या मुखचंद्राने चंद्रावर स्वारी करून त्याच्या कलांची लूट जिंकून आणली म्हणून चंद्राने हिला जाळण्यासाठी चोहीकडे चांदण्याचा वणवा पेटविला आहे. ’

‘ हिने आपल्या अंगाच्या गंधाने चंदनालाही जिंकून टाकले होते त्याचा सूड घेण्यासाठी त्या चंदनाने हिच्यावर शस्त्र उगारले आहे. ’

‘ हिने आपल्या कटाक्षांनी हरिणींना लाज आणली होती म्हणून त्या हरिणी जाऊन चंद्राआड लपल्या होत्या. त्या आता तेथून चांदण्याच्या रूपाने हसून हिला हिरमुसली करीत आहेत. ’

७०

## शुभशकुन

असे म्हणून रुक्मिणीभोवती दाटी करणाऱ्या सख्यांना तिने स्वतःच्या हातांनी दूर लोटले इतक्यात एकाएकी रुक्मिणीच्या दैवरेखेने पूर्वसूचना द्यावी तसे आश्चर्य दिसू लागले. पक्षी एकाएकी बोलू लागले. तेव्हा त्यांच्या वाणीचा अर्थ जाणणारी भावकलना म्हणाली,

'ऐका. ऐका. या पक्ष्यांचे शब्द शुभशकुन सांगत आहेत. मी त्यांचा अर्थ सांगते. ऐका. हे पोपट म्हणत आहेत, 'रुक्मिणीची तिच्या प्राणनाथाशी भेट खात्रीने होणार आहे. आमचे हे शब्द खोटे ठरले तर आम्हाला खुशाल आयुष्यभर पिंजऱ्यात कोंडून घाला.' या साळुंक्या म्हणत आहेत, 'शिशुपाळाला नेमलेली ही बायको गोपीनाथ कृष्ण पळवून नेणार आहे. आमचे हे शब्द खोटे होतील तर आमचे पंख गळून पडतील व आम्ही लांड्या होऊ.' या कोकिळा पंचमस्वरात सांगत आहेत, 'आजपासून पाचव्या दिवशी कृष्ण इथे येणार आहे. त्याआधी मात्र त्याची हिच्याशी भेट होणार नाही.' हे भुंगे त्यांच्या गुंजारवातून सांगत आहेत, 'भीमकीच्या जीवाचा स्वामी इथे येणार आहे. आमचे हे म्हणणे खोटे ठरले तर आमच्या तोंडातील मकरंदाचा घास तुम्ही खुशाल काढून घ्या.' हे मोर षड्ज लावून मेघांची शपथ घेत आहेत. आणि सांगत आहेत, 'आजपासून सहाव्या दिवशी अंबिका देवीच्या कृपेने कृष्णाला रुक्मिणीचे कन्यादान घडणार आहे.' हे राजहंस शुभवचने बोलून म्हणत आहेत, 'शिशुपालाला जर कृष्णाने ठकविले नाही तर आमच्या मुखात पुन्हा कधीही कमलाचे भोजन न पडो.'

शकुनांची ही फळे सांगितली जात होती तेव्हा हरिण हरिणीला अंग घाशीत उभे होते. शिशुपालाच्या डोळ्यादेखत रुक्मिणीला हरण करून कृष्ण तिला प्रीतीने कुरवाळणार होता हेच ते हरिण सुचवीत होते. पाणी लाटांच्या सादाने सांगत होते, 'जर कृष्ण इथे आला नाही आणि रुक्मिणीला भेटला नाही, तर आमच्या मांडीवर यापुढे कधी कमळे फुलणार नाहीत; कधी हंस डुलणार नाहीत.' सुगंधाचे भविष्य घडविणारा दक्षिणवारा घो घो घोंघावत होता. कृष्णाच्या भयाने शिशुपाल पळून जाणार होता याचीच सूचना तो देत होता. पुढील घटनांची चाहूल आपण घेतली आहे, असेच तो सांगत होता. सुगंध थुईथुई ओसंडत सांगत होते की मदनाचा स्वामी जो कृष्ण तो लौकरच इथे वसतीला येणार आहे. मदनाचा सेनापती वसंत ऋतू वनदेवीच्या कानांत गुणगुणत होता की शंकराने विधवा केलेल्या रतीला पुन्हा तिच्या सौभाग्याचे वरदान देण्यासाठी श्रीकृष्ण लौकरच इथे येणार आहे. चंदनाची झाडे आपल्या पानांनी एकमेकांना स्पर्श करीत

वसंतऋतू आकर्षून घेणारा कोणी मांत्रिक मिळेल काय ? रुक्मिणीला छळणारा हा सारा सुगंध उधळून लावणारा चंडवात कोणी निर्मील काय ? '

' अग, मलयाचलावर जे साप आहेत त्यांना दुधाची लाच देण्याचा नवस करा. म्हणजे तेच हा सारा सुगंध तिथल्या तिथे गिळून टाकतील. '

' अमृतासाठी वखवखलेल्या राहूला अमृताचा नवस करा. म्हणजे तो राहू या चंद्राला गिळून टाकील आणि रुक्मिणीचा कैवारी होऊन या चांदण्यातून तिची सुटका करील. '

एकीकडे असे बोलणे चालले असताच त्या सख्यांनी चांदण्याच्या प्रकाशात इंद्रनीळ मण्यांचा प्रकाश मिसळला आणि त्याचे धवल तेज मंद करून ते रुक्मिणीला कमी तापदायक करण्याची व्यवस्था केली. चन्द्रकमलापासून होणारा ताप कमी करणे त्या मानाने त्यांना सोपे गेले. कारण रुक्मिणीचा विरहाग्नी हा सूर्याप्रमाणे तापलेला असल्याने जणू सूर्याचाच हल्ला होत आहे असे मानून चंद्रकमले भ्याली आणि ती आपसुखच मिटली.

* * *

६९

## भावकलनेची चिंता

सख्यांची बोलणी ऐकून आणि कृती पाहून भावकलना म्हणाली,

' तुमचे उपाय हे तसे चांगले आहेत. पण त्यांचा काही परिणाम घडेल असे दिसत नाही. हिची अवस्था पराकोटीला गेलेली आहे. उपचार केले त्यांनी ही अधिकच शिणली आहे. आता ही हाताला लागते की नाही अशीच शंका मला वाटत आहे. '

* * *

७०

## शुभशकुन

असे म्हणून रुक्मिणीभोवती दाटी करणाऱ्या सख्यांना तिने स्वतःच्या हातांनी दूर लोटले इतक्यात एकाएकी रुक्मिणीच्या दैवरेखेने पूर्वसूचना द्यावी तसे आश्चर्य दिसू लागले. पक्षी एकाएकी बोलू लागले. तेव्हा त्यांच्या वाणीचा अर्थ जाणणारी भावकलना म्हणाली,

‘ऐका. ऐका. या पक्ष्यांचे शब्द शुभशकुन सांगत आहेत. मी त्यांचा अर्थ सांगते. ऐका. हे पोपट म्हणत आहेत, ‘रुक्मिणीची तिच्या प्राणनाथाशी भेट खात्रीने होणार आहे. आमचे हे शब्द खोटे ठरले तर आम्हाला खुशाल आयुष्यभर पिंजऱ्यात कोंडून घाला.’ या साळुंक्या म्हणत आहेत, ‘शिशुपाळाला नेमलेली ही बायको गोपीनाथ कृष्ण पळवून नेणार आहे. आमचे हे शब्द खोटे होतील तर आमचे पंख गळून पडतील व आम्ही लांड्या होऊ.’ या कोकिळा पंचमस्वरात सांगत आहेत, ‘आजपासून पाचव्या दिवशी कृष्ण इथे येणार आहे. त्याआधी मात्र त्याची हिच्याशी भेट होणार नाही.’ हे भुंगे त्यांच्या गुंजारवातून सांगत आहेत, ‘भीमकीच्या जीवाचा स्वामी इथे येणार आहे. आमचे हे म्हणणे खोटे ठरले तर आमच्या तोंडातील मकरंदाचा घास तुम्ही खुशाल काढून घ्या.’ हे मोर षड्ज लावून मेघांची शपथ घेत आहेत. आणि सांगत आहेत, ‘आजपासून सहाव्या दिवशी अंबिका देवीच्या कृपेने कृष्णाला रुक्मिणीचे कन्यादान घडणार आहे.’ हे राजहंस शुभवचने बोलून म्हणत आहेत, ‘शिशुपालाला जर कृष्णाने ठकविले नाही तर आमच्या मुखात पुन्हा कधीही कमलाचे भोजन न पडो.’

शकुनांची ही फळे सांगितली जात होती तेव्हा हरिण हरिणीला अंग घाशीत उभे होते. शिशुपालाच्या डोळ्यादेखत रुक्मिणीला हरण करून कृष्ण तिला प्रीतीने कुरवाळणार होता हेच ते हरिण सुचवीत होते. पाणी लाटांच्या सादाने सांगत होते, ‘जर कृष्ण इथे आला नाही आणि रुक्मिणीला भेटला नाही, तर आमच्या मांडीवर यापुढे कधी कमळे फुलणार नाहीत; कधी हंस डुलणार नाहीत.’ सुगंधाचे भविष्य घडविणारा दक्षिणवारा घो घो घोंघावत होता. कृष्णाच्या भयाने शिशुपाल पळून जाणार होता याचीच सूचना तो देत होता. पुढील घटनांची चाहूल आपण घेतली आहे, असेच तो सांगत होता. सुगंध थुईथुई ओसंडत सांगत होते की मदनाचा स्वामी जो कृष्ण तो लौकरच इथे वसतीला येणार आहे. मदनाचा सेनापती वसंत ऋतू वनदेवीच्या कानांत गुणगुणत होता की शंकराने विधवा केलेल्या रतीला पुन्हा तिच्या सौभाग्याचे वरदान देण्यासाठी श्रीकृष्ण लौकरच इथे येणार आहे. चंदनाची झाडे आपल्या पानांनी एकमेकांना स्पर्श करीत

विश्वासाने सांगत होती की गरुडध्वज कृष्णाचे आगमन नक्की होणार आहे. जरी त्या झाडांना आगीत जाळून कुणी विचारले तरीही त्यांच्या या वचनात फरक होणार नव्हता. चंद्राभोवती अद्‌भुत खळे पडले होते. आनंदाचा पाऊस लौकरच कोसळणार हाच त्या लक्षणाचा अर्थ होता. नवल असे की चांदण्याच्या स्पर्शातूनच थोडासा कापराचा वास येत होता. त्यामुळे कृष्णाच्या आगमनाची पूर्वसूचना रुक्मिणीच्या अंतर्मनाला जाणवत होती. वृक्षवेलींची पानेसुद्धा हालून एकमेकांत मिसळत होती. जणू वनातील पक्ष्यांनी आणि पशूंनी जे शुभशकुन सांगितले होते, त्यांची खूणगाठच त्या वृक्षवेली आपल्या पदराला बांधीत होत्या.

✠ ✠ ✠

७१

## भावकलनेचा आग्रह

भावकलनेने शकुनाचे अर्थ ओळखून सांगितले तेव्हा रुक्मिणी किंचित सावध झाली. होरपळलेले चंद्रकमळ चांदण्याने टवटवावे तसे दिसू लागले. ते पाहून भावकलनेचे डोळे आनंदाश्रूंनी ओलावले. ते डोळे हातांनी पुसून तिने इतर सख्यांना दूर पाठविले. एकान्त झाल्यावर ती, विरहिणी रुक्मिणीला म्हणाली,

'काय ग तुझे हे शहाणपण! मनातले गुपित तू मलाही सांगत नाहीस? आता हा इतका त्रास तुला सहन करावा लागला तो केवळ तुझ्या हटवादीपणामुळे उगाच ही जिवाची ओढाताण तू करून घेतलीस. वेड्या लज्जेच्या कड्यावरून उगाच स्वतःचा कडेलोट करून घेतलास. माझ्याहीपुढे जे तुला मोकळेपणाने सांगता येत नाही असे हे तुझे गुपित आहे तरी कसले? आजवर तू तुझ्या मनातील प्रत्येक गोष्ट मला सांगत आलीस. माझ्यापासून काहीही गुपित राखले नाहीस. कारण मी तुझी लाडकी होते. आता माझ्याहून अधिक लाडक्या कुणी तरी तुझ्या मनात घर केलेले आहे ना? तू काळजी करून नकोस. तू मला ओळखतेस. जे अघटित तेही करून दाखविण्याचे सामर्थ्य मला आहे. माझ्या बुद्धीने मी आकाशीची नक्षत्रे खुडून तुझ्या हातात देईन. तू भिऊ नकोस. जे मिळणार नाही असे तुला वाटत आहे ते हरप्रयत्नांनी मी तुला मिळवून देईन.'

✠ ✠ ✠

# ७२

## रुक्मिणीचे मनोगत

भावकलनेचे म्हणणे ऐकून रुक्मिणीने एक श्वास सोडला आणि बोलावयाचा धीर करून वर पाहिले. नंतर ती म्हणाली,

' सखे, प्रीतीच्या भोवऱ्यात सापडून माझ्या शहाणपणाचे तारू आता बुडत आहे. उत्कंठेच्या पतंगांच्या झडपामुळे माझ्या जाणिवेचा नंदादीप आता मालवत आहे. वासनांच्या दाटलेल्या ढगाआड माझ्या चातुर्याचे चांदणे लोपत आहे आणि प्रेमाच्या महापुरात माझ्या प्रतिष्ठेचे वृक्ष वाहून जात आहेत. '

कृष्णाच्या ओढीने बोलल्यावर रुक्मिणीच्या मनावरील लज्जेचा वेढा ढिला झाला. सारेच बोलून टाकण्याचा निश्चय करून प्राणाच्या धड्याने ती भावकलनेला म्हणाली.

' सखे, तू माझ्या मनात रहातेस. माझ्या मनातील सारे ओळखतेस तुझ्याहून अधिक जवळचे मला कोण आहे ? दुसऱ्याचे मन जाणणारी तुझ्यासारखी शहाणी मनकवडी मैत्रीण असल्यावर तिच्यापुढे मनातील गुपिते राखणे कुणाला शक्य होणार आहे ? आणि तुझी मदत न घेता जगणे तरी कुणाला शक्य होणार आहे ? तू माझ्या मनातले ओळखले आहेसच. आता कृष्ण सोडून स्वर्गातला देवसुद्धा माझ्या मनाला येणार नाही, मग पृथ्वीवरील राजे आणि राजकुमार यांचा प्रश्न कुठे येतो ? दुपारी राजसभेत किन्नराने पृथ्वीवरील सर्व क्षत्रियांचे वर्णन केले आणि शेवटी कृष्णाचे गुण गाइले. कृष्णाच्या वेधाची दीक्षा माझ्या मनाला त्याच गुरूने दिली. त्याने केलेले कृष्णाचे वर्णन ऐकूनच माझे मन कृष्णावर जडले. किन्नराने त्या मनमोहनाचे वर्णन केले त्याला मी कधी कुठे पाहिलेले नाही. परंतु किन्नराने केवळ शब्दातूनच त्याचा जो पुतळा निर्मिला त्याच्या सौंदर्यरसाच्या वेधाने मी भारून गेले आहे.

' ती शोभना सगुणमूर्ती आता माझ्या हृदयात आकारली आहे. लाडके, तिचे वर्णन करून सांगणे काही मला शक्य होणार नाही. परंतु मी आता त्या मूर्तीला सर्वस्वाने शरण गेले आहे. माझे तन, मन, प्राण मी त्याच्या पायावर वाहिले आहे. इथून पुढे तोच यादवांचा राजा कृष्ण माझ्या जिवाचा राजा आहे. कृष्ण कधी भक्तांची उपेक्षा करीत नाही असे संत म्हणतात ना ? मग अजून तो का येत नाही ? तो माझी उपेक्षा का करीत आहे ? की संतांचे बोलच खोटे आहेत ? की शिशुपाळाने माझ्याविषयी वासना धरली त्याचा कलंक मला लागला आहे ?

' पण हे बोलणे व्यर्थ आहे. या आशा विफल आहेत. लक्ष्मीसारखी स्त्री वश असता कृष्ण माझा स्वीकार करील असे मानणे हा वेडेपणाच आहे. पण तो नुसता

एकदा दिसेल अशी जरी आशा असती तरी मी कशीबशी जिवंत रहाते व त्याला डोळे भरून पाहून मग मी प्राण सोडला असता. आवडते माणूस दूर असले तरी ते डोळ्यापुढे उभे करण्याचे सामर्थ्य मनाला असते असे म्हणतात. मग माझ्या लाडक्या कृष्णाची मूर्ती माझे मन माझ्या डोळ्यापुढे का बरे उभी करीत नाही ? मला आता अधिक बोलवत नाही. शब्दांचाही मला शीण होत आहे. श्रीकृष्णाच्या चरणाकडे जाण्यासाठी मला प्रस्थान ठेवावयाचे आहे. ' शिशुपालाच्या नावाचा घातवार मधे आला आहे तो मला चुकवावयाचा आहे. मी आता कृष्णाशिवाय जगणार नाही. इतर कसल्याही उपायांचा काही उपयोग होणार नाही. कृष्णाची भेट व्हावी अशी काही युक्ती तुला सुचत असल्यास तू लगेच तशी योजना करशील तर बरे. '

✠ ✠ ✠

७३

## भावकलनेचे उत्तर

रुक्मिणी मोठ्या सायासाने एवढे बोलून थांबली. तेव्हा भावकलना विचार करू लागली. कृष्ण–रुक्मिणीची भेट घडवून आणण्याचा उपाय शोधण्यासाठी तिने आपल्या बुद्धीच्या अश्वावर खोगीर टाकून त्रिभुवनात संचार केला. नंतर ती म्हणाली,

' या संकटातून मार्ग काढणारा सुदेवासारखा दुसरा सोयरा नाही. महाराज भीमक यांनाही दोन शब्द सांगण्याइतकी त्याचीच त्यांच्याशी सलगी आहे. तुला त्यानेच शिकविले आहे. साऱ्या कला आणि शास्त्रे यात त्याच्याच कृपेने तू पारंगत झालेली आहेस. त्याचे तुझ्यावर पित्यासारखे प्रेम आहे. तो अतिशय विश्वासू आहे. तो मोठा रसिक वक्ता आहे. कृष्णाचे मन वळवून त्यांच्याशी संबंध जुळवून आणण्याच्या बाबतीत त्याच्याएवढा आणखी कुणाचा उपयोग होण्याजोगा नाही. '

✠ ✠ ✠

७४

## सुदेवाशी मंत्रणा

भावकलनेने सांगितलेला हा उपाय रुक्मिणीच्या मनाला आला. तेव्हा सुदेवाला आमंत्रण देण्यासाठी भावकलनेने कामसेनेला पाठविले. इंद्रजिताच्या नागपाशांनी राम व्यथित झाला असताना गरुड ज्या वेगाने धावून आला होता तशाच वेगाने रुक्मिणीचा निरोप कळताच सुदेव तिला भेटावयास आला. कल्पतरूच्या झाडांतून कातून काढलेल्या झोपाळयावर बसलेली रुक्मिणी सुदेवाच्या नजरेस पडली. कृष्णप्रीतीने क्षीण झालेली ती चंद्रवदना त्याला कृष्णपक्षात क्षीण झालेल्या चंद्रिकेप्रमाणे भासली. चंदनाची शाखा कोमेजली म्हणजे तिचा सुगंध चौपटीने उधळतो तसेच शिणलेल्या रुक्मिणीचे नाजुक लावण्य तिच्या सर्वांगी तरंगत होते. विरहाने जरी तिच्या अंगाला क्षीणता आलेली होती तरी तिच्या अवयवावर शृंगारसौंदर्य फुललेले होते. हे अवयव परब्रह्म श्रीकृष्णाचे भोग-विषय असल्याने त्यांच्या त्या सौंदर्याचे वर्णन विस्ताराने करणे उचित नाही.

रुक्मिणीची ती अवस्था जवळून पाहून सुदेवाने तिला आशीर्वाद दिला. तेव्हा भावकलनेने त्याचे सन्मानाने स्वागत करून त्याला पांढऱ्या शुभ्र मऊ आसनावर बसविले. सुदेवाला उत्थापन देण्यासाठी रुक्मिणी मोठ्या कष्टाने आणि संभ्रमाने उठू लागली पण तिला तिचा तोल सावरेना. तेव्हा कामकलेने तिला आधार दिला. सांभाळून सांभाळून शयनावरून खाली उतरविले आणि जरी ती अतिशय दुबळी झाली होती तरी तिला आणून सुदेवाच्या पायावर घातले तेव्हा सुदेवाने तिला ‘ मनोरथ पूर्ण होतील ’ असा आशीर्वाद दिला आणि नंतर तो हात जोडून तिला म्हणाला,

‘ माझे आई, तू इतकी कशाने एकाएकी वाळलीस !’

तेव्हा भावकलना सर्व दासी आणि सख्यांना म्हणाली,

‘ जा ग. तुम्ही क्षणभर बाहेर जा बघू. ’

आणि त्या गेल्यावर रुक्मिणीच्या व्यथेचे कारण सुदेवाला सांगण्यासाठी ती म्हणाली,

‘ आज भीमक महाराजांच्या राजसभेत कल्याणकीर्ती भाटाच्या परिवारातून एक किन्नर आलेला होता. त्याने राजसभेत गायन करून तीनही लोकांचे यथार्थ वर्णन केले. पृथ्वीतील साऱ्या राजांचे वर्णन तो करत होता. रुक्मिणी ते ऐकत होती. पण तिच्यावर त्याचा काही परिणाम झाला नाही. परंतु शेवटी त्या किन्नराने कृष्णाचे वर्णन केले. त्या गुणसागराचे किन्नराने केलेले ते वर्णन ऐकून रुक्मिणीचे मन त्याच्यावर जडले आहे. त्याचा तिला वेध लागलेला आहे. तिने मनातल्या मनात यदुनाथ कृष्णाला वरले आहे.

परंतु चांडाळ रुक्मीने याला विरोध मांडला असून रुक्मिणीला शिशुपाळाला देण्याचे ठरविले आहे. त्यामुळे दुःखाने ही अशी आटली आहे त्यात आणि कृष्णाच्या विरहाची भर पडलेली आहे.

' गुरुदेव, मदनाचा पराक्रम तुम्ही जाणता. उसाच्या कांडाचे धनुष्य आणि पाच फुलांचे बाण यांनीच त्याने शंकराला अर्धमेला केले होते. आता हा कृष्ण म्हणजे सौंदर्यात त्या मदनाचाही स्वामी. त्याच्या नुसत्या नावानेच मोठमोठ्यांचा महामोह भंग पावतो अशी त्याची ख्याती. मग त्याच्या विरहाने रुक्मिणीची अशी दशा व्हावी यात काही नवल नाही. तिची ही दशा श्रीकृष्णाच्या ओढीनेच झालेली असल्याने आता श्रीकृष्णाचीच जवळून भेट झाल्याशिवाय तिला उतारा पडणार नाही. हे धरणे त्याशिवाय सुटणार नाही. स्वप्नात वाय लागून मनुष्य आर्त झाला असेल तर त्याला जागे करणे हा एकच उपाय चालतो. विरहिणी प्रेमाने व्याकुळ झाली असेल तर तिला प्रियकराची मनसोक्त भेट हाच एक उपाय असतो. हिची आता ही अशी अवस्था झाली आहे. या संकटात तुम्हीच आमचे आधार आहात. सोयरे आहात. जो काही उपाय करणे असेल तो हिचे प्राण जावयाच्या आत तुम्हीच एक करावयास हवा— '

✠ ✠ ✠

७५

# सुदेवाची युक्ती

सुदेव जसा विद्येच्या तेजाने मोठा दर्शनीय होता, वाणीच्या गोडीने लक्ष्मीलाही भुलविणारा वक्ता होता, तसाच तो शब्दाआडचा अर्थ जाणणारा ज्ञाताही होता. भावकलनेच्या बोलातून त्याने रुक्मिणीचे मन ओळखले आणि प्रसन्न होऊन तो म्हणाला,

' परब्रह्म श्रीकृष्णाचाच वेध रुक्मिणीला लागला आहे याचा अर्थ आपणा सर्वांचेच दैव उदयाला येत आहे. मी नेहमी कृष्णाची स्तुतीच करीत आलो आहे त्यामुळे ही रुक्मिणी माझ्यावर प्रसन्न झाली आहे, व कृष्णाच्या भेटीचे पारितोषिक मोठ्या कृपेने मला देण्याचे तिने ठरविलेले दिसत आहे. '

नंतर रुक्मिणीकडे वळून तो म्हणाला,

' आई, आता तू मुळीच काळजी करू नकोस. शिशुपाल म्हणजे एक चिलट आहे असे मान. त्याची भीती बाळगू नकोस. त्रैलोक्यनाथ श्रीकृष्णाशी मी तुझी भेट

घडवीन याची खात्री बाळग; परंतु मी अशा आत्मविश्वासाने त्याला बोलाविलेले त्याला खपणार नाही. कारण त्याला अहंकाराची सावलीसुद्धा आवडत नाही. हे जितके खरे आहे तितकाच तो भक्तवत्सल आहे हेही खरे आहे. त्यामुळे तुझ्या भक्तीची हाक त्याला पोहोचली की तो आल्याशिवाय रहाणार नाही. तेव्हा तू तुझ्या मनातील भाव एका पत्रिकेत लिहून दे. मग तोंडाने काय सांगावयाचे ते मी सांगून त्याला तुझे म्हणणे पटवीन. चार दिवसांच्या आत मी कृष्णाला इथे आणू शकलो नाही तर मी जीव देईन याची खात्री बाळग. तरी आता तू असे कर. मला श्रीकृष्णाकडे जावयाची आज्ञा दे. तुझ्या मनात त्याला जी विनंती करावयाची आहे ती लिहून दे. तोंडानेही मी आणखी काही सांगावे असे वाटत असेल तर तेही मला नीट पढव. तुझे काम झाले असे समज.'

✣ ✣ ✣

७६

## रुक्मिणीची पत्रिका

मग रुक्मिणीने हातात भूर्जपत्र घेतले. आणि त्यावर कमलनालाच्या लेखणीने परागांची अक्षरे लिहीत कृष्णाला विनंतीपत्रिका लिहिली. ती अशी होती :

### स्वस्ति

' हे प्राणप्रिया, तुम्ही सर्वज्ञ आहात. या सर्व सृष्टीचे स्वामी आहात. तुम्हाला जे शरण येतात त्या भक्तांचे रक्षण, जसे पाखराचे रक्षण वज्राच्या पिंजऱ्याने करावे, तसे तुम्ही करता. मी तुमची दासी आहे. तुमच्या चरणी दंडवत प्रणाम करून मी तुम्हाला विनंती करीत आहे. ती ऐका.

माझ्या देवा, कौंडिण्यपुरात भीमक म्हणून जो राजा आहे त्याची मुलगी मी रुक्मिणी आहे. लहानपणापासून तुमच्याशिवाय दुसऱ्या कुणालाही मी माझ्या मनात थारा दिलेला नाही. नुकताच गेल्या वैशाखी पूर्णिमेला माझ्या वडिलांच्या राजसभेत एक किन्नर आला होता. त्याने तुमच्या चरणांचे वर्णन केल्यापासून मला तुमचे अधिकच वेध लागलेले आहेत.

आकाशात चंद्र विहरत असावा आणि राहूने येऊन त्याचा घास घ्यावा तसे आता घडावयास आले आहे. तुमच्या प्रेमाच्या आनंदात मी डुंबत असताना शिशुपाळ

जबरीने माझ्याशी लग्न करू पहात आहे. तुम्ही आता त्याचे थोबाड फोडावयास हवे आणि माझे रक्षण करावयास हवे.

भयानक रोगाने सर्वांग ग्रासून टाकावे तसे शिशुपालाने माझे सारे जीवन दाढेखाली घातले आहे. आता या रोगातून माझी सुटका करणारे वैद्यनाथ तुम्ही आहात. तुमच्याशिवाय दुसरा कोणताही उतारा इथे चालणार नाही. प्राणनाथ, तुम्ही मला पदरात घ्याल की नाही या आशंकेची व्यथा माझ्या जिव्हारी जखमा करीत आहे. मी अबला आहे. माझी मुक्तता तुम्हीच करावयास हवी.

माझ्या जीवा, किन्नराने तुमचे वर्णन केल्यावर तुमच्या ओढीचे गोड विष माझ्या सर्वांगात मुरलेले आहे. आता तुम्ही दृष्टीला पडल्याशिवाय त्या विषावर उपाय चालणार नाही. तुम्ही निर्मळ, निर्गुण, परब्रह्म आहात. मी वासनांनी कलंकित अशी एक सामान्य जीव आहे. परंतु पातकी असले तरी ते शरण आल्यावर तुम्ही त्यांना मिठीत घेताच हे मला माहिती आहे म्हणून मी मोठ्या आशेने तुम्हाला शरण येत आहे.

अधिक काय लिहू. तुम्ही सर्वज्ञ अशी तुमची कीर्ती जगात आहे. मग माझी अवस्था जाणणे तुम्हाला कठीण नाही. ती जाणावी आणि मला भेट द्यावी. ते शक्य होत नसेल तर तुम्ही अनाथाचे नाथ आहात असे म्हणवून घेऊ नये. बिरुदांची जी ओझी तुम्ही वहाता ती अकारणच मानून ती सोडून द्यावी.

प्रीती ही शब्दांनी वर्णन करता येत नाही. प्रेमसुखाचे वर्णन शब्दांनी अधिक अधिक करीत गेले तर त्या प्रीतीचे मोल उणे होते. तुम्ही जाणत्यांचे राजे आहात. मी विनंती लिहिली आहे ती थोडक्यात आहे. पण तिच्यामागे जो व्यापक अर्थ आहे तो तुम्ही मनाच्या मनात जाणून घ्यावा.'

* * *

७७

## सुदेवाची पाठवणी

रुक्मिणीने अशी पत्रिका लिहिली आणि ती सुदेवाच्या हाती दिली. तिच्या विरहाला आता उशीर सहन होत नव्हता. त्यामुळे ती त्याला लगेच निरोपाचा विडा देऊ लागली. परंतु ती ज्या ज्या विड्याला स्पर्श करू लागली त्याचे त्याचे पान करपू लागले. तेव्हा ती संतापून पानदासीला म्हणाली,

७०

## शुभशकुन

असे म्हणून रुक्मिणीभोवती दाटी करणाऱ्या सख्यांना तिने स्वतःच्या हातांनी दूर लोटले इतक्यात एकाएकी रुक्मिणीच्या दैवरेखेने पूर्वसूचना द्यावी तसे आश्चर्य दिसू लागले. पक्षी एकाएकी बोलू लागले. तेव्हा त्यांच्या वाणीचा अर्थ जाणणारी भावकलना म्हणाली,

'ऐका. ऐका. या पक्ष्यांचे शब्द शुभशकुन सांगत आहेत. मी त्यांचा अर्थ सांगते. ऐका. हे पोपट म्हणत आहेत, 'रुक्मिणीची तिच्या प्राणनाथाशी भेट खात्रीने होणार आहे. आमचे हे शब्द खोटे ठरले तर आम्हाला खुशाल आयुष्यभर पिंजऱ्यात कोंडून घाला.' या साळुंक्या म्हणत आहेत, 'शिशुपाळाला नेमलेली ही बायको गोपीनाथ कृष्ण पळवून नेणार आहे. आमचे हे शब्द खोटे होतील तर आमचे पंख गळून पडतील व आम्ही लांड्या होऊ.' या कोकिळा पंचमस्वरात सांगत आहेत, 'आजपासून पाचव्या दिवशी कृष्ण इथे येणार आहे. त्याआधी मात्र त्याची हिच्याशी भेट होणार नाही.' हे भुंगे त्यांच्या गुंजारवानून सांगत आहेत, 'भीमकीच्या जीवाचा स्वामी इथे येणार आहे. आमचे हे म्हणणे खोटे ठरले तर आमच्या तोंडातील मकरंदाचा घास तुम्ही खुशाल काढून घ्या.' हे मोर षड्ज लावून मेघांची शपथ घेत आहेत. आणि सांगत आहेत, 'आजपासून सहाव्या दिवशी अंबिका देवीच्या कृपेने कृष्णाला रुक्मिणीचे कन्यादान घडणार आहे.' हे राजहंस शुभवचने बोलून म्हणत आहेत, 'शिशुपालाला जर कृष्णाने ठकविले नाही तर आमच्या मुखात पुन्हा कधीही कमलाचे भोजन न पडो.'

शकुनांची ही फळे सांगितली जात होती तेव्हा हरिण हरिणीला अंग घाशीत उभे होते. शिशुपालाच्या डोळ्यादेखत रुक्मिणीला हरण करून कृष्ण तिला प्रीतीने कुरवाळणार होता हेच ते हरिण सुचवीत होते. पाणी लाटांच्या सादाने सांगत होते, 'जर कृष्ण इथे आला नाही आणि रुक्मिणीला भेटला नाही, तर आमच्या मांडीवर यापुढे कधी कमळे फुलणार नाहीत; कधी हंस डुलणार नाहीत.' सुगंधाचे भविष्य घडविणारा दक्षिणवारा घो घो घोंघावत होता. कृष्णाच्या भयाने शिशुपाल पळून जाणार होता याचीच सूचना तो देत होता. पुढील घटनांची चाहूल आपण घेतली आहे, असेच तो सांगत होता. सुगंध थुईथुई ओसंडत सांगत होते की मदनाचा स्वामी जो कृष्ण तो लौकरच इथे वसतीला येणार आहे. मदनाचा सेनापती वसंत ऋतू वनदेवीच्या कानांत गुणगुणत होता की शंकराने विधवा केलेल्या रतीला पुन्हा तिच्या सौभाग्याचे वरदान देण्यासाठी श्रीकृष्ण लौकरच इथे येणार आहे. चंदनाची झाडे आपल्या पानांनी एकमेकांना स्पर्श करीत

ळणारा, चवरी धरणारा असा सेवकवर्ग होता. या साऱ्यांसाठी रुक्मिणीने मोठे वेगवान घोडे दिलेले होते आणि ते त्यांच्यावर आरूढ होऊन सुदेवाच्या दोन्ही अंगांनी चालले होते. चालता चालता सुदेव सोबत्यांना म्हणाला,

' काय तुमचे नशीब बलवत्तर आहे पहा. पृथ्वीवर अवतार घेऊन चालणारा बोलणारा परमेश्वर तुम्ही तुमच्या डोळ्यांनी आता प्रत्यक्ष पहाणार आहात. '

तेव्हा सेवक म्हणाले,

' द्विजराज, गाड्याबरोबर नळ्याला यात्रा त्यातली ही गत आहे. आम्ही सदैव तुमच्या बरोबर असतो त्याचे हे फळ आहे. नाही तर आमच्यासारख्या क्षुद्र मशकांची ईश्वराची भेट कोठून झाली असती ! '

अशा प्रकारे बोलत मोठ्या उल्हासाने त्यांचा प्रवास चालला होता. अर्ध्यावर त्यांनी एक मुक्काम केला. तेथून उठताना त्या दिवशी कृष्णाची भेट घ्यावयाचीच अशी प्रतिज्ञ सुदेवाने केली. त्याप्रमाणे त्यांचे घोडे न थांबता चालत राहिले. त्यांनी काठेवाड ओलांडले. आणि नंतर जेथे उग्रसेनाच्या लोकांसाठी श्रीकृष्णाने द्वारकेची रचना केली होती, त्या भूमीच्या परिसरात ते येऊन पोहचले. तेव्हा सुदेव सोबत्यांना म्हणाला,

' पहा. हा प्रदेश कसा दिसत आहे पहा. ते पर्वत किती उंच आहेत पहा. जणू काय येथे मेरूनेच आपला मुक्काम ठेविला आहे. माणसांची दाटी तर इतकी दिसत आहे की नुसती काळी भूमी अशी कुठे दिसत नाही. सगळीकडे नगरे वसली आहेत. पाखरांना भूमीवर उतरावयास जागा नाही यामुळेच भिऊन ती बहुधा सदाचीच आकाशात उडत आहेत आणि एकएका पायाला विश्रांती देण्यासाठी मधे मधे एकाच पायावर उभी रहात आहेत. ऊस आणि तांदूळ याचे भरघोस पीक चोहीकडे दिसत आहे. आंब्याच्या राया तर लाखांनी दिसत आहेत. अष्टभोग इथे जणू दासासारखे सदाचे शरण आहेत आणि त्याच्यावर हे जग राज्य करीत आहे असे दिसत आहे. चोहीकडे भली भरभराट दिसत आहे. व्यापारी आणि उदमी यांची चलती आहे. दैत्यांना जिथे मुळी प्रवेशच नाही अशा देवनगरीसारखी ही भूमी दिसत आहे. '

वाटेत त्यांना जे जे लोक भेटत होते ते ते म्हणत होते की श्रीकृष्ण मोठ्या अलौकिक पद्धतीने राज्य करीत होता. द्वारकेत जे सुख नांदत होते त्याचे वैभव तीनही लोकांत मावू नये असे होते. यापूर्वी जे चक्रवर्ती राजे होऊन गेले होते ते प्रजेकडून करभार घेत आणि कारभार करीत. कृष्णाचे असे नव्हते. तो स्वतःचेच सारे प्रजेला देत असे. कृष्ण हा प्रजांचा मायबाप होता. साऱ्या राज्याचाच जणू तो कुटुंबप्रमुख होता. सज्जनांचा पालनकर्ता होऊन तो राज्य करीत होता.

* * *

७९

## द्वारकेचे दर्शन

अशा प्रकारे गप्पागोष्टी करीत चालले असता ते जिथे बळीरामाची पाणपोई होती तिथे येऊन पोहोचले. चंद्रकान्त मण्याची बांधलेली ही पाणपोई वेगळ्याच तऱ्हेची होती. येथे नुसत्या पाण्याचीच सोय नव्हती तर स्त्रीसुखापर्यंत सारे अष्टभोग इथे कुणालाही लाभत असत. द्वारकेच्या ज्या वैभवाची कीर्ती सर्वत्र पसरली होती त्या वैभवाची चुणूकच या पाणपोईवर मिळत असे. दूरवर असणारी द्वारकानगरी तेथून दिसत होती. त्रिलोकाला वंद्य झालेल्या त्या सुवर्णनगरीचे तेज सूर्याला फिके पाडीत होते. तेजाच्या ज्या प्रकाशधारा नगरीतून आकाशात उंच उंच उसळत होत्या त्या पाहून प्रकाशाचे जणू अरण्यच नगरी-भोवती वाढले असावे किंवा अरुणाचे सैन्य कृष्णाला मानवंदना देण्यासाठी उभे राहिले असावे असे वाटत होते. सुदेव आपल्या हाताने ती नगरी आपल्या सांगात्यांना दाखवीत होता. आनंदाची दिवाळीच चाललेली असावी, किंवा आकाशीच्या साऱ्या ज्योतीच एकदम उजळल्या असाव्या, किंवा यादवांच्या पराक्रमाचे तेजोभूषण आकाशाला वाहिलेले असावे, किंवा राहूला भिऊन सूर्याने आपल्या तेजाचे भांडार इथे लपवून ठेवले असावे, किंवा गगनरूपी विश्वव्यापी गणेशमूर्ती शेंदुराने मढवून काढली असावी, अशी ती द्वारका दुरून दिसत होती. त्या नगरीचे दर्शन होताच सगळेजण घोड्यावरून उतरले आणि त्यांनी ती नगरी म्हणजे मुक्तिनगरी आहे हे ओळखून तिला लोटांगण घातले.

* * *

८०

## नगरीभोवतीचे खंदक

नंतर ते घोड्यावर बसून पुढे निघाले तेव्हा दूरवर चोहोबाजूला हिरव्यागार रंगाच्या वनराया दिसू लागल्या. कल्पवृक्ष, मांदारवृक्ष अशा स्वर्गीय वृक्षांच्या या राया अलिकडे होत्या. त्याअलिकडे चारी बाजूला नगराबाहेर समुद्राचा वेढा होता. समुद्राचा तो खंदक पाताळाहूनही अधिक खोल होता. त्याच्या खोलीचे मोजमाप लागणेच कठीण. तो खंदक जणू काय वरुणदेवतेचा पलंग असावा तसा विस्तृत होता. ब्रह्मांड व्यापून

राहिलेले पाणी श्रीकृष्णाच्या भेटीस यावे तसा तो खंदक दिसत होता. किंवा प्रलयमेघांनी आपले विश्रांतिस्थान द्वारकेच्याभोवती केलेले असावे असे वाटत होते. या सागरात प्रचंड लाटा उसळत, मधेच त्यात भोवरे गरगरत, मधेच उसळीने खळखळत पाणी उंच उडे. मधेच उकळत असल्यासारखे खाली-वर होई, मधेच कोमल लाटांनी नर्तन करी तर मधेच कारंजासारख्या धारांत उंचावून चिपके मारी. त्या पाण्यातील जलचर एकमेकां-वर गुरगुरत, त्यांचा आवाज आकाशातील घनगर्जनेसारखा वाटे. सुसरी, मगरी, नाना प्रकारचे मासे, नाना प्रकारचे जलचर प्राणी हे मधून मधून पाण्याबाहेर उडया मारीत, त्या उडया इतक्या उंच असत की आकाशातील नक्षत्रांची आमिषे त्यांच्या तोंडांत येतील असे वाटे. तेथे हा समुद्र ओलांडण्यासाठी लहानमोठ्या होडया, जहाजे, तारवे, तराफे, डोगकी, जोडहोडया यांची रेलचेल होतीच पण आकाशातील मेघांनाही आडोसा करू शकतील अशी महाप्रचंड जलयानेही तेथे होती.

✠ ✠ ✠

८१

## द्वारकेभोवतीची वने व उपवने

सुदेवाने तो सागर पाहिला आणि त्यातील चमत्कार आपल्या सोबत्यांना दाखविले. नंतर तो त्या नोकरांसह तारवात बसला आणि समुद्र ओलांडून पैलतीराला जाऊन पोहोचला. तेथे जणू आकाशाने मेघाची वीणच घातलेली आहे असा भास उत्पन्न करणारी घनदाट निळी अरण्ये चौफेर पसरली होती किंवा समुद्रात रहाणाऱ्या विष्णूनेच दाट सावलीच्या आधाराने तेथे मुक्काम केला असावा असा भास तो निळा वर्ण पाहून होत होता. त्या वनातील झाडाझाडाने कृष्णाची नीलवर्ण शोभा स्वीकारलेली दिसत होती आणि त्या शोभेचा गहिरा बहर आकाशात उमटलेला भासत होता. इंद्रनील रत्नाचेच रोपटे असावे आणि त्याभोवती कस्तुरीचे आळे केलेले असावे तसा भास सुगंध ओतणाऱ्या निळया मातुळप वृक्षाची वने पाहून होत होता. जसे वसंताचे निवासस्थान असावे, जशी मकरंदाची रास असावी, जसे कृष्णसेवेला आलेले वनदेवाचे सैन्यच असावे, तसे ते वन दिसत होते.

पूर्वेला सुधावन होते. आग्नेयीस विलासवन होते. दक्षिण दिशेला अनेक राजवने होती. नैर्ऋत्येला मोठाले क्रीडावन होते. पश्चिमेला लक्ष्मीवन होते. वायव्येला कंदर्पवन

होते. उत्तरेला अचाट असे वसंतवन होते. ईशान्येला सुंदर शृंगारवन होते. जणू काय कृष्णाची सेवा करण्यासाठी आठ लोकपालांनीच ही आठ वने पाठविलेली होती. त्या बाहेर सोळा हजार बागा होत्या. त्यांची रचनाही रसिकांच्या मनाला आनंद देईल अशीच होती. केवळ मर्यादेत मावणार नाही यामुळेच त्याचे वर्णन करणे इथे शक्य नाही.

द्वारकेची लांबी छत्तीस गावे होती. रुंदी सोळा गावे होती. त्या अलीकडे छत्रीसारखी गोल ही वने होती आणि त्याभोवती खंदक होता. कैलासपर्वतावर, मेरूपर्वतावर, नंदनवनात, सत्यलोकात, वैकुंठात, ज्या ज्या झाडांची नावेही माहीत नव्हती ती या द्वारकेच्या उपवनात वाढलेली होती. जणू झाडाच्या रूपाने का होईना पण कृष्णाजवळ रहावयास मिळाले तर त्यामुळे कैवल्यानंदाची प्राप्ती होईल हे ओळखून देवच सुरतरूंचा वेष घेऊन द्वारकेभोवती रहावयास आले होते.

* * *

८२

## वसंताचा विलास

त्या उद्यानातून ऋतुराज वसंत मूर्त होऊन विराजत होता. भ्रमर, कोकिळा, हंस, चकोर, चक्रवाक इत्यादी जीवसृष्टी आणि आम्रमंजिरी, मदनबाण, मधुमालती, मोगरा, जाई-जुई ही सारी पुष्पसृष्टी म्हणजे वसंताचा परिवार तोही वसंतासह तेथे अवतरला होता. जणू श्रीकृष्णाने मदनाला जीवदान द्यावे अशी त्याची प्रार्थना करण्यासाठीच तो त्याच्या सेवेत सादर झाला होता. शृंगाररसाचा सेनापती असावा, अथवा रतीचा हितकर्ता असावा किंवा कामदेवाची कीर्ती फुलाफुलावरून लिहिणारा लेखनिक असावा; तसा तो वसंत भासत होता किंवा या भुवनातील सारी मस्ती एकवटली असावी किंवा अष्टभोगाची धुंदी जगाला चढली असावी, किंबहुना नानाविध रतिसुखाचा सुकाळच मूर्त झाला असावा असे वाटत होते. छे! छे! हा वसंत म्हणजे सौंदर्याचा महामंत्र होता. तो म्हणजे रतिवासनेला भरते आणणारे मादक मद्य होता. शंकरावर हल्ला करून चाललेले ते जणू मदनाचे सैन्यच होते.

तो वसंत म्हणजे प्रीतिभावाचे भविष्य लिहिणारा ज्योतिषी होता. मनोजयी मुनिजनांचीही वासना पालवावी आणि त्यांच्या मनात संयम आणि भोग यांचे द्वंद्व

उसळावे असे त्या वसंताचे सामर्थ्य होते. प्रीतीच्या संगमात मदालसा स्त्रीला मिळणारा तो सदाचा विजय होता. तो म्हणजे संभोगसुखाने चालविलेला दीपोत्सवच होता. संभोगाच्या ओढीने जळणाऱ्या विरहिणी या दिवाळीतील दीपमाळा होत्या. जितेंद्रियांनीही वैराग्याचे जू झुगारून द्यावे अशी साधना करणारी ती किमया होती. चातकांच्या आनंदसुखाचा हा वसंत म्हणजे जणू पावसाळा होता. कोकिळांच्या आलापी हेच त्या पावसाळ्यातील गाजणे होते, परागांची उधळण हे त्या पावसाळ्याचे विजाळणे होते, मकरंदाच्या गळणाऱ्या धारा हे त्याचे बरसणे होते.

वसंत मूर्त झाल्याचाच भास आसमंतात होत होता. वसंताची ती मूर्ती चंद्राच्या गाभ्यासारखी गोरी–सावळी दिसत होती. त्याच्या डोळ्यांनी नील कमळांना जिंकले होते. कमलरंगाचे लाल जरतारी सुवर्णवस्त्र तो नेसला होता. त्याच्या हातात लीलाकमळ शोभत होते. मदनापेक्षाही तो अधिक सुंदर होता. त्याच्या अंगावर चंदनाची उटी लावलेली होती. सर्वांगावर पुष्पकळ्यांचे अलंकार त्याने धारण केले होते आणि माथ्यावर आम्रमंजिरीचा तुरेदार शेला घातलेला होता. प्रत्यक्ष भोगवासनाच वसंताच्या संभोगाने बहरली होती. त्याच्या डोळ्यांच्या कोपऱ्यात माज ओसंडत होता. वृक्षवेलीच्या छाया-कुंजातून वनदेवींना भोगसुखाचे दान करीत तो फिरत होता. मदनाचा सखा असा तो वसंत गंधाने धुंद झालेल्या मलयानिलावर आरोहण करून मोठ्या ऐटीने त्याच्या परिवारासह वनात हिंडत होता.

त्याच्याबरोबर आम्रमंजिरी आणि चंदन हे छत्रधर होते. कमलिनी या त्याच्यावर मृणालाच्या चवऱ्या ढाळणाऱ्या दासी होत्या. जलाशय हे त्याचे पाणी देणारे नोकर होते. कामवासना ही विडे देणारी दासी होती. चारी पावलांवर उडणारे कस्तुरीमृग त्याच्यापुढे नाचत होते. शेपट्यांचे गोंडे उभारणारे पाडे आणि उभ्या शिंगाचे सांबर हे त्याचे भालदार होते. ते आपल्या शिंगांनी चोहीकडे धडका देत जणू मार्ग मोकळा करीत होते. जाईच्या वेली या त्याच्या फुलमाळणी होत्या. त्याच्या धनुर्धर सैनिकाचेही काम त्या करीत होत्या. पानाआडून फुलांच्या कटाक्षाचे बाण त्या सारख्या मारीत होत्या. राजहंसाच्या टोळ्या या म्हणजे जणू शंखभेरी वाजवीत चाललेल्या आघाडीच्या तुकड्या होत्या. त्यांच्याच बरोबर मोरांच्याही टोळ्या आपल्या डोकीवरील कुंचे मिरवीत चाललेल्या होत्या. चक्रवाक आणि चकोर हे त्याचे बर्चीधर होते. भीतिदायक मार्जार हे त्याचे खड्गधर होते. सायाळरूपी त्याचे घोडेस्वार मोठ्या दाटीवाटीने चाललेले होते. साळुंक्या आणि पोपट म्हणजे त्याचे गुणगान करणारे वाचाळ भाट होते. एकाच वेळी घुमणारे पारवे म्हणजे त्या वसंत सैन्याच्या आघाडीचे रणढोलच होते. नानाविध पक्ष्यांचे शब्द हीच जणू वसंताची इतर रणवाद्ये होती. भुंगे फुलांच्या पाकळ्यांवर बसून मृदुंग वाजवीत होते. पक्ष्यांची मकरंदात रंगलेली पिवळट पिले आपल्या अस्पष्ट शब्दात ताल धरीत होती आणि कोकिळा मोठ्या कौतुकाने रंगात येऊन संगीत गात होत्या.

ऋतुराज वसंताचे हे सैन्य असे होते की त्याच्या तावडीत सापडलेल्या स्त्रियांना प्रेमाचा अनावर उन्माद येत होता. नपुंसकालासुद्धा रतिसुखाची मस्ती यावी असे कर्तृत त्या वसंताच्या मोहिनीत होते. हा वसंत ऋतू सृष्टीत असा माज ओतीत होता की त्याने माजोरे झालेले सूर्यकिरण भरदिवसा कमलिनीला मिठी घालीत होते. कमलिनीच्या प्रणयात गुंतलेला सूर्य पुढे चालावयासच विसरल्यामुळे दिवस लांबलेले वाटत होते. चोहीकडे फुले अगदी बयात आली होती. विड्याने रंगलेले नाहीत असे ओठ कुठे दिसतच नव्हते. साऱ्या जगाला पाणी पिण्याची असोसी लागलेली होती. ती जणू अधरपानाच्या ओढीचाच पर्याय होता.

कस्तुरीच्या सुगंधाने साऱ्या विश्वाला मोहवून टाकले होते. कापुराने प्रणयीजनांच्या मुखातून स्वतःला विरवून घेतले होते. चंद्राने आपल्या किरणांनी जगाला अलंकृत केले होते. सगळीकडे रेशमी वस्त्रे अंगाशी झुळझुळत होती. चांदणे सगळ्यांना मिठीत घेत होते. विलासिनींच्या स्तनाला लागलेले चंदन स्पर्श सुखाचे राज्य भोगीत होते. सृष्टीवर एक संभोगसुखाचेच राज्य चाललेले होते. कामशास्त्राला या संभोगराजाचे प्रधानपद मिळालेले होते आणि कटाक्षांची सैन्येच्या सैन्ये तरुणांवर हल्ला करून त्यांना जिंकून संभोगराजाचे दास करीत होती.

कुंकुमकेशराने लेपलेली तरुणींची अंगे आता अलंकाराचे ओझे वाहू शकत नव्हती. म्हणून ते रतिलीलांत त्रास देणारे अलंकार उतरून त्यांनी आता कापुराचे हलके फुलके शीतसुगंधी अलंकार घातले होते. रतिलीलांत हे अलंकार चुरडून त्याचाच अंगराग बने आणि गंधसुख व स्पर्शसुख यांचे वैभव फुले. शृंगाराचे हे वैभव नुसते उतास आले होते. वासनांची पराकोटी झालेली होती. जलक्रीडा अधिकच आनंददायी झाल्या होत्या. कामीजन एकमेकांवर अनेक तऱ्हांनी पाणी उसळून त्यांना भिजवीत होते. रंगपंचमीसारखी परागाची उधळण चाललेली होती. अनेक रंगांची नाजूक आणि तलम वस्त्रे कुंकुम–कस्तुरीने रंगलेली दिसत होती.

जलसिंचन करणारे पाट चोहोकडे वहात होते. चंदनाचे हिंडोले जागोजाग झुलत होते. जलवर्षाव करणाऱ्या झाऱ्या भरल्या जात होत्या. फुलांच्या शय्या रचल्या जात होत्या. परागांच्या उशा बनत होत्या. बिसतंतूंचीच वस्त्रे विणली जात होती. संध्या रंगाची वेडावणारी उधळण चोहोकडे चालली होती. चोहीकडे सदाचेच हिमासारख्या थंडगार चांदण्याचे धुंद वातावरण पसरलेले दिसत होते. कृष्णाची आवड ओळखून वसंताने हे धुंदफुंद वातावरण ओतलेले होते.

कोकिळा पंचम स्वर लावून कानाला धुंद करणारा वसंत राग आळवीत कृष्णाची स्तुती गात होत्या. ते संगीत ऐकण्यासाठी दिशाच आकार घेऊन आल्यासारखे वाटत होते. मकरंदाचे मद्य पिऊन मलयाचलावरील गंधवारा बेहोष झाला होता आणि मंदपणे

झुलत होता. त्यात भरीला भर म्हणून हे सौंदर्य पाहूनच जणू चंद्र हिमासारखा थंड झाला होता. चांदण्यात मिसळलेला हा सुगंध असा मादक होता की त्यामुळे मानिनीची लाज सुटून त्या कामिनी बनत होत्या आणि आकर्षणाच्या ओढीने मध्यस्थीशिवायच प्रियकराच्या भेटीला जात होत्या. प्रेमकलहात रुसावयाचे भानही या वेळी कोणाला उरत नव्हते.

वसंत ऋतूचा हा पुष्पपराक्रम असा आगळा होता की स्त्रियांचा वेध ज्याला लागला नाही असे स्थिरचर काही उरले नव्हते. स्त्रियांनी आपणांस मिठी मारावी असे डोहाळे वृक्षांनासुद्धा लागलेले होते. मदनाचे जे पराक्रम चालले होते त्याला वसंतच कारण होता. नाही तर उसाचे धनुष्य आणि फुलांचे बाण यांनी मदनाला काय जमले असते ! पण वसंतासारखा सेनापती होता म्हणून देवांनाही जिंकणे त्याला शक्य होत असे. कमलांच्या कळ्या हेच जणू या वसंताचे मदनासाठी वापरावयाचे पुष्पशर होते. त्याच्या देठांना दांड्याचा आकार होता. कळ्या अग्रासारख्या दिसत होत्या. आणि त्यांचा सुगंध हेच घायाळ करणारे विष होते. पुष्पपरागांची धुंदी अशी मादक होती की भल्याभल्यांनाही त्याची झिंग येत होती. तेथे बिचाऱ्या विरहिणीची अवस्था जी काय झाली होती ती काय वर्णावी !

भरदिवसा वृत्तीत चांदणे फुलविणारा हा वसंताचा पराक्रम सुदेवाने पाहिला, वसंताचे उद्योग पाहिले. मदनाचा पराक्रम पाहिला. त्याला वाटले अनंगाच्या या वसंत-मित्राने शेवटी कृष्णाच्या परवानगीने मदनाला पुन्हा जीवदान दिले आहे. तो सोहळा साजरा करण्यासाठीच वसंत मोहराची पालवी फुलवीत आहे; वेली फुलांचे बहर ओतीत आहेत; वनस्पती आपल्या अंगीच्या सुगंधाने भरलेले पेलेच्या पेले वातावरणात रिते करीत आहेत.

✠ ✠ ✠

८३

## ही तयारी कशासाठी

सुदेवाला ही शोभा पाहून वाटले की वनदेवता जणू सूचनाच देत आहेत. त्या म्हणत आहेत, ‘ रतीची प्रार्थना ऐकून मदनाला जन्म देण्यासाठी मन्मथनाथ श्रीकृष्ण या वनात येणार आहे, त्याचे स्वागत नीट व्हायला हवे. ’ तेवढ्यात त्याला वाटले वसंत

७०

## शुभशकुन

असे म्हणून रुक्मिणीभोवती दाटी करणाऱ्या सख्यांना तिने स्वतःच्या हातांनी दूर लोटले इतक्यात एकाएकी रुक्मिणीच्या दैवरेखेने पूर्वसूचना द्यावी तसे आश्चर्य दिसू लागले. पक्षी एकाएकी बोलू लागले. तेव्हा त्यांच्या वाणीचा अर्थ जाणणारी भावकलना म्हणाली,

'ऐका. ऐका. या पक्ष्यांचे शब्द शुभशकुन सांगत आहेत. मी त्यांचा अर्थ सांगते. ऐका. हे पोपट म्हणत आहेत, 'रुक्मिणीची तिच्या प्राणनाथाशी भेट खात्रीने होणार आहे. आमचे हे शब्द खोटे ठरले तर आम्हाला खुशाल आयुष्यभर पिंजऱ्यात कोंडून घाला.' या साळुंक्या म्हणत आहेत, 'शिशुपाळाला नेमलेली ही बायको गोपीनाथ कृष्ण पळवून नेणार आहे. आमचे हे शब्द खोटे होतील तर आमचे पंख गळून पडतील व आम्ही लांडया होऊ.' या कोकिळा पंचमस्वरात सांगत आहेत, 'आजपासून पाचव्या दिवशी कृष्ण इथे येणार आहे. त्याआधी मात्र त्याची हिच्याशी भेट होणार नाही.' हे भुंगे त्यांच्या गुंजारवातून सांगत आहेत, 'भीमकीच्या जीवाचा स्वामी इथे येणार आहे. आमचे हे म्हणणे खोटे ठरले तर आमच्या तोंडातील मकरंदाचा घास तुम्ही खुशाल काढून घ्या.' हे मोर षड्ज लावून मेघांची शपथ घेत आहेत. आणि सांगत आहेत, 'आजपासून सहाव्या दिवशी अंबिका देवीच्या कृपेने कृष्णाला रुक्मिणीचे कन्यादान घडणार आहे.' हे राजहंस शुभवचने बोलून म्हणत आहेत, 'शिशुपालाला जर कृष्णाने ठकविले नाही तर आमच्या मुखात पुन्हा कधीही कमलाचे भोजन न पडो.'

शकुनांची ही फळे सांगितली जात होती तेव्हा हरिण हरिणीला अंग घाशीत उभे होते. शिशुपालाच्या डोळ्यादेखत रुक्मिणीला हरण करून कृष्ण तिला प्रीतीने कुरवाळणार होता हेच ते हरिण सुचवीत होते. पाणी लाटांच्या सादाने सांगत होते, 'जर कृष्ण इथे आला नाही आणि रुक्मिणीला भेटला नाही, तर आमच्या मांडीवर यापुढे कधी कमळे फुलणार नाहीत; कधी हंस डुलणार नाहीत.' सुगंधाचे भविष्य घडविणारा दक्षिणवारा घो घो घोंघावत होता. कृष्णाच्या भयाने शिशुपाल पळून जाणार होता याचीच सूचना तो देत होता. पुढील घटनांची चाहूल आपण घेतली आहे, असेच तो सांगत होता. सुगंध थुईथुई ओसंडत सांगत होते की मदनाचा स्वामी जो कृष्ण तो लौकरच इथे वसतीला येणार आहे. मदनाचा सेनापती वसंत ऋतू वनदेवीच्या कानांत गुणगुणत होता की शंकराने विधवा केलेल्या रतीला पुन्हा तिच्या सौभाग्याचे वरदान देण्यासाठी श्रीकृष्ण लौकरच इथे येणार आहे. चंदनाची झाडे आपल्या पानांनी एकमेकांना स्पर्श करीत

फुलांचा रस वहात होता. काहींतून मद्य वहात होते. तर कामिनींना चुळा टाकून बाग शिंपिता यावी यासाठी काहींतून शुद्ध पाणीच वहात होते.

बागेत जे वृक्ष होते त्यांची उंची सांगणे कठीणच होते. त्यांच्या फुलाआड तारका निस्तेज झालेल्या दिसत. त्यांच्या शाखा आपल्या पदराआड झाकून फळांची वाणे दाही दिशांना वाटीत. त्या वनातील आश्चर्याचे वर्णन करणे कठीणच आहे. वारा जेव्हा परागांच्या राशी त्यांच्या फुलातून उधळवी तेव्हा त्या राशी जमिनीवर येऊन विसावत आणि जणू जी पिकलेली फळे वरून खाली पडत ती फुटू नये यासाठी मऊ बैठक तयार होत असे. अनेक द्वीपांतील नाना प्रकारच्या फुलवेली त्या उद्यानात होत्या. श्वेतद्वीपातील अनेक प्रकारच्या नारळी होत्या. शंखद्वीपातील फळवाल्या वेली होत्या. वनमाळी कृष्णाची पूजा करण्यासाठी स्वर्गातील फळांच्या वृक्षवेलींच्या पंक्ती या उद्यानात आल्या होत्या असा भास अंतरिक्षात लोंबणारे कल्पवृक्षाचे घड पाहून होत होता. गोपालकृष्णाची पूजा करण्यासाठी रायखजुरी, सुरपोफळी या वृक्षांनी जे फळांचे घड धारण केले होते ते जणू आकाशातून नक्षत्रांचा फुलोरा बांधलेला असावा तसे दिसत होते.

आंबे सदाचेच फळांनी भरलेले होते. त्यांच्या कोवळ्या पालवीच्या पताकांवर बसून कोकिळा आंब्यासारख्याच मधुर अशा पंचम स्वराने कृष्णाच्या पराक्रमाची गीते गात होत्या. चोहोवार चंदनाची झाडे बहरली होती. असे वाटत होते की, इंद्राच्या वज्राला भिऊन मलयपर्वत कृष्णाच्या आश्रयाला आला होता, त्याचेच हे ध्वज चोहीकडे उभे राहिलेले होते आणि सुगंधाने लवून कृष्णाला शरण जात होते. सोनजांभळांचे फळांनी भरलेले वृक्ष म्हणजे जणू सोन्यालाच फळे आली आहेत असे वाटत होते. पिकून उफललेल्या फळांतील सोनेरी रसाचे प्रवाह रत्नांच्या पाटातून खळखळत वाहत होते.

सोनपाखरांची पिले मधुकेसरावर बसून एकमेकांच्या मुखात चारा घालीत होती. ती जणू गरुडाच्याच विणीसारखी दिसत होती. दुधावर पोसलेल्या द्राक्षांच्या वेलीला मोतिया रंगाच्या आणि आवळ्या एवढ्या आकाराच्या द्राक्षांचे घोस लोंबत होते ते जणू स्वातीच्या मेघातून निपजलेल्या मोत्यांच्या विणीप्रमाणे दिसत होते. कामोन्मत्त झालेले पक्षी माधवी लतांच्या बहरावर बसून फुलवेलीच्या संगतीतच कृष्णाच्या स्तुतीची गीते गात होते.

उंच वृक्ष पाहून असे वाटत होते की चकोराला चांदण्याचा पाहुणचार देण्यासाठी डोक्यावर चंद्र धारण करणारा शंकर भूवर उतरणार होता, त्याला उतरावयास स्वर्गापर्यंत गेलेल्या त्या शिड्याच होत्या. रायमातुलुंगीचे वृक्ष केशरी रंगाचा बहर उधळत फुलले होते, ते जणू कृष्णाला भेट देण्यासाठी सोने उधळीत आहेत असे वाटत होते. उमा-वनातील नारंगी इथे बहरल्या होत्या. त्यांच्या सुरंगी मधुकेसराचा विलास ठायीठायी दिसत होता. संध्यारंगासारख्या रंगलेल्या फळांची दाटी त्यांच्या सर्वांगावर झालेली होती. कृष्णाचे सुंदर दात पाहून लाल रत्नांची भांडारे शरमिंदी झाली होती तीच जणू पिकून उफललेल्या डाळिंबाच्या आड लपली आहेत असे वाटत होते.

ओळीने निंबोण्या लगडल्या होत्या. सिंहीवनातील सोनकेळी घडांनी वाकल्या होत्या. दूरदेशाहून आणलेल्या दूधरसाने भरलेल्या फळझाडांच्या रांगा फळांनी झुबकल्या होत्या. वैकुंठलोकीच्या अनेक वेली, कैलासावरील गोड फणस, बदरीकाश्रमातील नक्षत्रासारख्या घोसाळ बोरांचे वृक्ष, चोहीकडे फळले होते. दुधाळ रसांनी भरलेले ते वृक्ष आपल्या शाखांच्या गुंतागुंतीने आकाशाची मोजणी करीत असावे तसे वाटत होते. स्वतःच्या फळांनी त्यांची नंदनवनातील फळांशी चढाओढ चाललेली होती. जणू नवरत्नांनाच पिले झाली असावी असा आभास निर्माण करणारी अनेक पाखरे आपल्या स्वरांच्या रंगांनी किन्नरांनाही लाज वाटेल असे गाणे गात होती. कल्पतरूपेक्षाही अधिक सुख देणारे, अमृतापेक्षाही अधिक रस देणारे असे ते वृक्ष केवळ एक द्वारकेच्या त्या उद्यानातच एकत्र झालेले होते व निरंतर बहरलेले होते. त्या वनात सूर्यकिरणांना प्रवेश नव्हता. अर्थात त्यामुळे अंधार होता आणि वनाचे दैवी सौंदर्य दिसत नव्हते असा मात्र प्रकार नव्हता. कारण त्या वनातून ज्या सुंदर स्त्रिया फिरत होत्या त्यांच्या सौंदर्याचे गोरे शीतल चांदणे चोहोकडे पसरलेले होते.

✠ ✠ ✠

८५

## उद्यानातील इतर वनस्पती

या उद्यानातील विहिरी होत्या त्या रत्नांच्या बांधलेल्या होत्या. त्यात उतरावयाच्या पायऱ्या स्फटिकांच्या होत्या. जागोजाग कोनाड्यातून विष्णुसहस्रनामातील विष्णूचे दर्शन घडविणाऱ्या मूर्ती कोरलेल्या होत्या. मेघमंडळावर इंद्रधनुष्याची शोभा शोभावी तशी त्या सुरम्य निळ्या वनातून सोनजांभळाची शोभा साजरी दिसत होती. संभोग करून शिणलेल्या तरुणी त्यांच्या ओठाचा चावा घेण्यासाठी धावणाऱ्या भुंग्यांपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी सोनचाफ्याच्या झाडाखाली जाऊन विश्रांती घेत होत्या. भुंगे त्या बाजूला फिरकत नव्हते. कारण सोनचाफ्याचा अतिदाट सुगंध म्हणजे आपला मृत्यू हे भुंगे ओळखून होते. तरुणीचे सुगंधी ओठ चुंबावयास न मिळाल्याने आता ते भुंगे आपल्या भ्रमरीकडेच झेपावले होते आणि फुलातील मधाने मधुर झालेल्या त्यांच्याच मिठीत शिरून प्रीतीचे गीत गात आंब्याच्या पालवीवर झुलत होते. त्यांचे गीत कंबळ आणि अश्वतर या पाताळातील प्रसिद्ध गायकांच्या गीताहून अधिक मादक होते. ते जणू त्या गीताने कृष्णाची प्रार्थना करीत होते की त्याने आता जगज्जेत्या मदनाला नवजीवन द्यावे. सुगंधी

पाडळीचे समूह जणू कस्तुरीचीच झाडे असावी तसा सुगंध ओतीत होते. कृष्णागरूची दाट बने नैसर्गिकरीत्याच पालवली होती व गंधोद्दाम निःश्वास टाकीत होती. एकमेकांना चिकटलेले पुष्पकेसर मकरंदाच्या छावणीसारखे दिसत होते आणि त्याभोवती भ्रमरीचा हात हातात धरून नाचत भुंगे पिंगा घालीत होते.

कर्णिकाराची फुले माजाला आलेल्या तरुणीच्या फुगीर स्तनांप्रमाणे डवरली होती. सिंधुवार वृक्षांची फुले मोत्यांचे भांडार उघडलेले असावे तशी तळपत होती. बटमोगरे आपल्या सहस्र पाकळ्यांनी उमलले होते. केशरी शेवंती भ्रमरांचे थवे उरावर घेऊन झुलत होत्या. त्या एकंदर मकरंदी वातावरणाने मनोजयी लोकांची मनेसुद्धा वासनांनी पाघळत होती. पुष्परसाचीच जणू शय्या पसरली होती. बाजूला कोकिळा कानाला उन्मादाचा संचार करणारे गीत गात होत्या. भुंगे ताल धरीत होते आणि हंसांनी त्या तालावर मोठ्या आनंदाने मदनाची पूजा आरंभिली होती. जागोजाग, अशोक, बकुळ, पुन्नाग, बचकुंद, कल्हार हे सुगंधी वृक्ष आपल्या सुंदर केसरांची कुंकुमकेशरासारखी शोभा उधळीत बहरले होते. मदनमोगरे आणि कर्पूरकर्णिका यांची फुले बटमोगऱ्यांच्या फुलांना तुच्छतेने हसत भ्रमरांना पैजेने सांगत होती की त्यांचाच सुगंध अधिक मोहक होता. सुगंधी मकरंदाने भरलेली ही फुले म्हणजे जणू वसंताची चलती नाणी होती अथवा प्रणयमंत्राची बीजाक्षरेच होती. कृष्णाला भेट देण्यासाठी अनेक तरुणी ही फुले वेचीत होत्या. नवथर तारुण्याच्या राशीसारख्या दिसणाऱ्या त्या सुंदरी म्हणजे जणू तारुण्य-नगरीचा व्यापार चालविणाऱ्या बाजारपेठाच होत्या. या नगरात मकरंदाच्या व्यापारालाही जणू ऊत आला होता आणि तो व्यापार करणारे भ्रमर फुलांची मापे भरभरून चंदन वेलीवर, मदनचाप्यावर आणि इतरही फुलवेलींवर मकरंदाची देवघेव करीत होते.

✠ ✠ ✠

८६

## वनस्पतीचा वनदेवतांशी संवाद

वनातील ही सौंदर्यक्रीडा पाहण्यासाठी गंधर्वांच्या लेकी तिथे आलेल्या होत्या. त्या मदाने धुंद होऊन गात होत्या. त्या गाण्याने भुललेल्या हरिणी जवळ आल्या की त्याही धुंद होऊन कस्तुरी ढाळीत होत्या, आणि जणू गाण्याचा मोबदलाच देत होत्या, वनस्पती आणि वनदेवता आपसात बोलत होत्या. त्या म्हणत होत्या,

"श्रीकृष्णाचे रूप पाहिले की त्यापुढे परब्रह्माचे सौंदर्यही ओबडधोबड वाटावे यात नवल नाही. कृष्णाचे रूप पाहिले की सौंदर्याची शोभा अंतरीच्या चैतन्याला स्पर्शून जाते. ते लावण्य केवळ निरुपम आहे. नुसती नयनकटाक्षांनी त्याला मिठी मारून त्या रूपाची पुरती जाण होतच नाही तर डोळ्यांनी दिसणारे ते रूप, त्याचा पुरता आस्वाद घ्यावा यासाठी मिठीतही धरावे असे वाटते."

"कृष्णाला नीट म्हणून पहायला जावे तर सगळीकडे तोच आहे असे दिसू लागते. जणू आपल्या डोळ्यांच्या बाहुल्यांनाच तद्रूपतेचे पिसे लागलेले आहे."

"तुमचे ठीक आहे हो. तुम्ही कृष्णाला पुरते पाहू तरी शकता. आम्हाला नुसते श्रीकृष्णाचे चरण पाहिले म्हणजेच आनंदाचे भरते येते. मोठ्या कष्टाने त्यावरचे रूप पाहावयाचे म्हटले तर डोळेच दिपून जातात. त्यामुळे आम्ही आपला आमचा जीव त्याच्या चरणावरच लावलेला आहे."

माळ्यांच्या मुली, वनचरांच्या लेकी, सरोवरांतील जलदेवता, वनदेवता यांच्यात अशाच तऱ्हेचे संवाद चोहोकडे चाललेले होते. राजहंस हंसिणीला हेच सांगत होते. कोकिळा चातकीला हेच ऐकवीत होत्या. पोपटाच्या प्रियकरिणीबरोबर साळुंक्यांचे संभाषण चालले होते ते याच विषयावरचे होते.

✠ ✠ ✠

८७

## सरोवरे आणि कमळे

भोवती सुंदर सरोवरे होती. ती म्हणजे जणू कृष्णाच्या सेवेसाठी समुद्राने पाठविलेले सैन्य होते. त्यांच्याशी तुलना करता क्षीरसमुद्र म्हणजे बांध घालून अडविलेले पाण्याचे डबके होते. ही जी सरोवरे होती त्यात कुणाचे काठ सोन्याने बांधविलेले होते. कुणाचे रत्नांच्या शिलांनी बांधलेले होते. आत अनेक तऱ्हांच्या कमलिनींच्या रांगा फुलल्या होत्या. नवरत्नांचेच पेरलेले बी उगवून आले असावे तशी ती कमळे अनेक रंगांची होती. त्यांच्यावर भ्रमर आणि भ्रमरी हातलोंबीचा खेळ खेळत होत्या. पृथ्वीवरील कमळे क्षणभंगुर असतात, म्हणून वैकुंठराज विष्णूने ही कधीही न कोमेजणारी कमले देवाधिदेव कृष्णाच्या सेवेसाठी पाठविली होती. या कमळाच्या परागांतील

सुगंधानेच अनंगाला जीवदान दिले होते. लक्ष्मीचीही गाढ प्रीती त्यांनी संपादन केली होती म्हणून ती कमला त्यांतच रहावयास आली होती. त्या कमळांवर भ्रमरांच्या पायांच्या हालचालींनी रेघोट्या उठल्या होत्या. त्या रेघोट्या म्हणजे जणू तिने श्रीकृष्णाला पाठविलेले पत्र होते. श्रीकृष्णाप्रमाणेच सुंदर दिसणाऱ्या मदनाला जन्म देऊन त्याने तिला सौभाग्य द्यावे अशी विनंती त्या पत्रात केलेली होती.

✠ ✠ ✠

८८

## देवांनी अवतार घेतले

कृष्णाची सेवा करता यावी अशा ओढीने विष्णू, शंकर, ब्रह्मदेव, इंद्र यांनी झाडांचे अवतार घेतलेले होते. त्यातही नवल नव्हते, कारण कृष्णाचा महिमाच तसा होता. इंद्रगगन नावाची झाडे होती त्यांची खोडे संध्यारंगाची होती. खांद्या आणि डहाळे हे इंद्रनीळ रंगाचे होते. त्याला नक्षत्रांची फुले फुलत आणि चंद्राची फळे धरत. रसरंजन या झाडाचे खोड पाचूचे होते. त्याला सोन्याची दाट पालवी फुटलेली होती. त्याला नवरत्नांचा मोहोर आला होता आणि नक्षत्रांच्या घडांची फळे लागली होती. कामकेशर वृक्षाचे अंग चंदनाचे होते. त्याला कस्तुरीच्या फांद्या होत्या आणि सातशे पाने होती. त्याला कमळाच्या आकाराची फुले आली होती. त्याची फळे होती त्यांना विशेष गुण होता. ती खाल्ली की लगेच कामवासनेला बहर येत असे. देववल्लभ वृक्षाला हरिचंदनाचे अंग होते. त्याची पाने, फुले, पराग पारिजातकासारखे होते. त्याला कल्पतरूची अनेक फळे लागलेली होती. या वृक्षाचे नुसते दर्शन होताच वैकुंठलोकांतील सारी सुखे लाभत. कदाचित सुदैवाने त्यांच्या फळाची रुची घेता आली तर सारी वैभवे प्राप्त होत. या साऱ्या वनात परिमळाचा व्यापार चाले. भ्रमर हे त्या परिमळाचे घाऊक व्यापारी होते. त्यांच्याकडून तो परिमळ घेऊन गावोगाव नेण्याचे काम मलयानिलासारखे फिरते व्यापारी करीत.

✠ ✠ ✠

८९

## यादवांच्या कुमारी

या उपवनातील सरोवरातून यादवांच्या कन्या वनदेवतांबरोबर जलक्रीडा करीत होत्या. त्या प्रणयोन्मादाने फुललेल्या किन्नरीसारख्या दिसत होत्या. त्यांनी नाना प्रकारचे शृंगार केलेले होते. मृदू आणि कोमल अशी कळ्यांची लेणी सर्वांगी धारण केली होती. चांदण्यापेक्षाही पारदर्शक अशी तलम झिरझिरीत रेशमी वस्त्रे त्या नेसल्या होत्या. ती वस्त्रे अंगाशी ओढून घेऊन त्यांनी निरीची गाठ घातली होती. उत्तरीय ओढून घेऊन त्याला आतील पदराची गाठ घातली होती. खांद्यावरून वस्त्रे अशी ताणून घेतली होती की त्यामुळे त्या वस्त्रांच्या ताणातून त्यांच्या स्तनांची उभार वर डोकावीत होती. त्यांचे अवयव इतके उन्मादक दिसत होते की आपण पुरुष बनून त्यांचा उपभोग घ्यावा अशी वासना त्यांच्याच मैत्रिणींना होत होती. नपुंसकाच्या नजरेस त्या पडल्या तर त्यालाही तात्काल पौरुष फुटावे अशी उन्मादक मोहिनी त्यांच्या शृंगारात होती.

त्या हसत होत्या त्याचे वर्णन काय करावे! ते हास्य नजरेला पडले की चूर्ण केलेला कापूर कुणी तरी अंगावर शिंपला असे वाटे. त्यांच्या अंगाचा वर्ण इतका सुंदर आणि तेजस्वी होता की त्याच्यापुढे त्या अंगावर लावलेले अंगरागच फिके पडलेले होते. त्या आपल्या तळहातांनी पळसाची रंगीत फुले पाण्यात कुसकरीत होत्या त्यामुळे आधीच सुगंधी केलेले ते पाणी रंगत होते. या पाण्याचा मारा करण्यासाठी त्यांनी इंद्रनील मण्याच्या पिचकाऱ्या हातात घेतलेल्या होत्या. पण त्यांच्या निळ्या नयनांच्या तेजांत त्या पिचकाऱ्या मिसळून गेल्याने त्या कुणाच्या लक्षातही येत नव्हत्या. त्यामुळे त्या लपविण्याची जरूरच नव्हती. त्या हसत तेव्हा चांदणे उसळले असे वाटे आणि त्या चांदण्यात त्यांच्या पिचकारीतील धार लपून जाई. ज्यावर पाण्याचा मारा होई त्यांना पाणी सुटल्याचे कळतही नसे. वस्त्रे चिंब भिजून अंगाला चिकटत आणि केळीच्या गाभ्यासारखे रसरसलेले त्यांचे अवयव उठावून आकारत. आपापल्या मैत्रिणींच्या प्रेमगुपितांचा स्फोट करीत हसत खिदळत त्या अशी जलक्रीडा करीत होत्या. जणू श्रीकृष्णाशी जी जलकेली करावयाची तिचा त्या सरावच करीत होत्या. पाणी शिंपण्याच्या आनंदात त्यांची वस्त्रे केव्हाच अंगाला भिडून गेली होती. रत्नाच्या पुतळीची कांती जशी पुतळीपासून वेगळी जाणवतच नाही तशी त्यांच्या अंगीची वस्त्रेही आपण आहोत याची जाणीवच देत नव्हती. यदुराय कृष्णाची जी जलकेली इथे होत असे तिचे वर्णन हा प्रसंग साधून करावे असे मनात आहे. पण नकोच तो मोह. कारण एकदा ते वर्णन चालू झाले म्हणजे रसांचा प्रवाह आवरणार नाही आणि कथेचा प्रवाह मात्र थबकून राहील.

✠ ✠ ✠

९०

## सुदेवाचा द्वारकेत प्रवेश

त्यापुढे भाताची अनेक शेते होती. त्यांचे वर्णन करावयाचे तर एवढेच सांगितले म्हणजे पुरे की त्यांच्या गुणांनी डोळे, नाक, जिव्हा इत्यादी सारीच पंचेंद्रिये तृप्त होऊन जात आणि त्यांचे पारणे फिटे. पुढे पानवेलींची सुंदर आगरे होती. नाना प्रकारच्या उसांची शेते होती. गूळ, साखर आणि खडीसाखर गाळावयाचे घाणे त्या भोवती जागो-जाग पसरले होते.

ही अनेक प्रकारची उद्यानरचना सुदेव आपल्या सोबत्यांना समजावून सांगत होता. शेवटी तो द्वारकेजवळ पोहोचला आणि कृष्णाचे दर्शन घेण्यासाठी नगरात शिरावयास प्रवृत्त झाला. नगराच्या आत काही राजकुमार आपल्या घोड्याची क्रीडा कौतुकाने पहात होते. काही तालीमखान्यात सराव करीत होते, काही पारव्यासारखे घुमत होते. सृष्टीतील सर्वश्रेष्ठ अशा त्या नगराचा बाह्यपरिसरच दृष्टी खिळून टाकावी असा नयनरम्य होता. त्याचे वर्णन आता नरेन्द्र करीत आहे.

* * *

९१

## द्वारका नगरीचे दृश्य

पश्चिम समुद्राला भास्वत असे नाव आहे. याच्या पोटात पाचशे गावे विस्ताराचा रत्नाचा पर्वत आहे. त्याच्यावर छत्तीस गावे व्याप्तीची द्वारका नगरी एखाद्या स्वयंभू लेण्याप्रमाणे आधारली होती. जसे आनंदाचे मोठे विशाल बेट असावे, किंवा जशी सुखाची सुगंधी पेटी असावी, किंवा ब्रह्मविद्येचे मोठे बंदर असावे तशी ती नगरी शोभत होती. समुद्रामधे स्वर्गाचे प्रतिबिंब पडावे, किंवा जलाशय दाटत दाटत नगराच्या आकारात मुरावा, किंवा परमेश्वराने समुद्रावर कळसूत्री बाहुल्यांच्या खेळाचा रंगमंच मांडावा तसे ते नगर दिसत होते. त्या नगराकडे पहाताच असे वाटे की तारकासुराला भिऊन देवांनी जो नक्षत्रांचा साठा सागरात लपविला तोच हा आहे, किंवा शंकराला भिऊन मदनाचे जे सैन्य पळाले त्याची ही छावणी आहे.

परब्रह्माने घेतलेले श्रीकृष्णाचे रूप हीच जणू आंदोलनाची मोठी दिवाळी होती. आणि त्यासाठी स्वर्गीच्या साऱ्या तेजज्योती त्याला ओवाळून आल्या होत्या. किंवा कुबेराची सारीच्या सारी नऊ भांडारे ब्रह्मानंदाचा चारा चरण्यासाठी इथे एकत्र आली होती. किंवा क्षीरसागरापेक्षा अधिक डामडौलाने परब्रह्माची पूजा करावी अशा ईर्ष्येने रत्नाकर भाग्रताने आपल्या राज्यातील सारे वैभवच कृष्णपूजेसाठी द्वारकेच्या रूपाने इथे जमविले होते.

द्वारकेची वस्ती इतकी दाट होती की एकवीसच्या एकवीस स्वर्ग एकत्र केले असते आणि त्यात भरीला ब्रह्मदेवाच्या ब्रह्मलोकाचा पासंग टाकला असता तरी ते सारे पारडे द्वारकेच्या तुलनेने हलके ठरून वरच गेले असते. शंकराचा कैलास पर्वत इतका वैभवसंपन्न म्हणतात, पण द्वारकेची कीर्ती त्याने ऐकली होती त्याच क्षणी तो लाजेने गारठून थंडगार झालेला होता. इंद्राची अमरावतीही शरमून गेली होती व आपणास द्वारकेचे वैभव मिळावे म्हणून मंदाकिनीच्या तीरी तपश्चर्या करीत होती. द्वारकेला आलेले पावित्र्य पाहून वैकुंठाचे पावित्र्य, महाबली पुरुषाला पाहून लाजणाऱ्या नपुसकासारखे लाजलेले होते. विख्यात असे श्वेतद्वीप द्वारकेचा उदय झाल्यावर तिच्या कीर्तीला भिऊन क्षीरसागरात लपले होते.

✠ ✠ ✠

## ९२

## नगराभोवतीची मुख्य भिंत

नगराभोवती चंद्रकान्त मण्याचा कोट होता. तो इतका उंच होता की जणू सारे आकाश हेच एक तलाव होते आणि तो तलाव याच कोटाच्या आधाराने आकारला असून त्यात चंद्र आणि सूर्य ही रात्री व दिवसा उगवणारी कमळे फुलली होती. किंवा हा कोट म्हणजे चांदणे मोजण्याचे एक प्रचंड मापच होते. किंवा तो म्हणजे नक्षत्रांची लपवायची जागा होती. किंवा आकाशाच्या शाळुंकेभोवती गुंडाळलेली तेजाळ मेखला म्हणजेच तो कोट होता. या कोटाची भिंत ही धुतलेल्या सहाणेप्रमाणे स्वच्छ होती. तिचे सौंदर्य पहावयाचे म्हटले तर नजर एका ठिकाणी ठरत नसे व तिची घसरगुंडी होत असे. मन सुद्धा त्या घसरगुंडीबरोबर घसरून अलीकडील खंदकात पडत असे. त्यामुळे कुणाही माणसाला ती भिंत पार करून आत जाणे हे अशक्यच होते. भिंतीची उंची इतकी होती की तिच्यावर जे माणकांचे चिरे बसविले होते त्यांचाच प्रकाश

आकाशातून खाली पडे आणि त्या प्रकाशापुढे सूर्याची आठवणही न यावी असा तो लोपून जात असे. त्या भिंतीवर इंद्रनीळ मण्यांचे जे बुरूज होते तेही एखाद्या पर्वताची शिखरे असावी तसे उंच होते.

✠ ✠ ✠

९३

## भिंतीतील दरवाजे

या भिंतीत पाणी बाहेर जाण्यासाठी नऊशे फटी होत्या. आत प्रवेश करण्यासाठी चौसष्ट दरवाजे असून त्या साऱ्यांना सोनजांभळींचे उंबरठे बसविलेले होते. या साऱ्या दरवाजांवर सोळा खणी माड्या होत्या आणि त्या माड्या कलाकुसरीने कोरलेल्या होत्या. स्वयंभू दिसावी अशी कला त्यांवर पसरली होती. आवेशयुक्त सिंहांनी शोभिवंत दिसणारे कठडे त्यांना लाविले होते. षड्विकारांचे भाव दर्शविणाऱ्या पुतळ्या तुळयांच्या दर्शनी भागी कोरल्या होत्या. सुदेव ब्राह्मण या साऱ्यांचे सौंदर्य आपल्या सांगात्यांना समजून दाखवीत होता.

उंबरठ्यावर दरवाजे होते ते मोत्यांच्या झुबक्यांनी अलंकृत केलेले होते. उघडता-मिटताना या दरवाजांचा आवाज होई तो घनगर्जनेप्रमाणे वाटे. या साऱ्या दरवाजां-भोवती नगरीचे रक्षण करणारे सुदर्शन चक्र फिरत राही व त्याच्या छायेतच दरवान आपले काम करीत. हे सारे दरवाजे प्रत्येकी इतके विस्तृत होते की आठऱ्या आठ लोकपाल त्यातून एकाच वेळीं आत प्रवेश करू शकत; किंवा आठही दिग्गजांचा थवा एकाच वेळी त्या दरवाजात मावू शके.

✠ ✠ ✠

९४

## आतल्या इतर भिंती

ही बाहेरची भिंत जशी चंद्रकान्ताची होती तशाच आतील इतर भिंती नवरत्नांच्या होत्या. त्यांची वेगवेगळी शोभा वर्णावी तरी किती ! जणू काय नवग्रहांची मंडळेच कृष्णाच्या सेवेसाठी द्वारकेत होती असे त्या भिंती पाहून वाटे. या भिंतीभोवती सात खंदक होते. पाताळातूनच वर आले असावे अशी त्यांची खोली होती. त्यांना पाहून असे वाटे की अगस्तीला भिऊन पळालेले हे सात समुद्रच इथे कृष्णाच्या आसऱ्याला आलेले आहेत. दोन दोन भिंतींमध्ये सुमारे तीन तीन गावांची रुंदी होती. त्यातून कुबेराच्या नऊ निधींची संपत्ती कृष्णाला नजराणा आल्याप्रमाणे पसरली होती.

पहिल्या दोन भिंतींच्या आत श्रीकृष्णाचा अमर्याद परिवार पसरलेला होता. या ठिकाणी अठरा पगड जातीची जा–ये आणि व्यापार चाले. त्यापुढील तीन भिंतींच्या परिसरात राज्याचे चतुर्विध सैन्य पसरलेले होते. तेथील सेनापतीच्या छावण्यांचा विस्तार पाहिला की दिशांचा गोंधळ उडून जात असे. त्यापुढील दोन भिंतींच्या पटांगणात सव्वा लक्ष ब्राह्मणांची वसती होती. त्या ब्रह्मपुऱ्या कृष्णाने ब्राह्मणांनाच अर्पण केलेल्या होत्या. नवव्या भिंतीच्या आत बारा गावांचा विस्तृत प्रदेश होता. तेथे लक्ष्मीविलास श्रीकृष्ण यादवांसह रहात असे. यदुनाथ कृष्ण इतका रूपवान होता की, त्याच्या वदनाच्या शोभेने चंद्रालाही जिंकून दास केले होते. तो इतका उदार होता की त्याने आपल्या दानाने क्षीरसमुद्रालाही जिंकले होते. त्या यादवरायाचे जे पराक्रमी सैन्य होते त्याचेही वर्णन नरेन्द्र करीत आहे.....,

*( येथेच अपुऱ्या अवस्थेत ग्रंथ संपतो. )*

✠ ✠ ✠

## नवी प्रकाशने

**नरेंद्र : रुक्मिणी-स्वयंवर**
आनंद साधले

**मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या**
शं. बा. जोशी
वसंत जोशी

**दीपगृह** (वि. स. खांडेकर यांची निवडक पत्रे)
संपादक : वि. वा. पत्की

**य. गो. जोशी : व्यक्ती व वाङ्मय**
सौ. सुनंदा दास

**नाथसंप्रदाय**
म. रा. जोशी

**जॉर्ज बर्नार्ड शॉ**
वि. ह. कुलकर्णी

'नरेंद्रपंडिताचे रुक्मिणीस्वयंवर' हा ग्रंथ महानुभाव पंथाने पवित्र मानलेल्या सात ग्रंथांतील एक ग्रंथ आहे. मराठीच्या भाषाशास्त्राच्या दृष्टीने पहाता महानुभावांचे ग्रंथ सांकेतिक लिपीत लिहिले गेले, ही घटना मोठी भाग्याची मानली जाते. कारण त्यामुळे तत्कालीन मराठी भाषेचे स्वरूप एका अनुस्वाराचाही फरक न होता जसेच्या तसे लिपिबद्ध राहिले आणि पुढील अभ्यासकांना उपलब्ध होऊ शकले. ही घटना अपूर्वाईची तर खरीच, पण यात्र घटनेचा परिणाम असाही झाला की महानुभावीय ग्रंथाच्या रसास्वादाला सामान्य वाचक पारखा झाला. सांकेतिक लिप्यांचे गूढ फोडण्याचा रोमांचकारी पराक्रम इतिहासाचार्य राजवाडे यांनी केल्यानंतर हळूहळू हे रसभांडार मराठीच्या महानुभावपंथेतर वाचकांना उपलब्ध होत आहे. पण अजूनही या उपलब्धीत सुलभता नाही. कारण या ग्रंथाचे आज देवनागरीत जे अवतार होतात ते सारे अभ्यासकांच्या सोयीसाठी असतात. रसिकाला जिद्द असेल तरच तो या अभ्यासकांशी दहीकाल्याची झुंबड लावून चार दोन रसबिंदू मिळवू शकतो.

रुक्मिणीस्वयंवराचा कर्ता नरेन्द्रपंडित हा ज्ञानेश्वरांना समकालीन होता. देवगिरीच्या उपान्त्य मराठा राजा रामदेवराव यादव याच्या राजसभेत तो बसे. त्याने रुक्मिणीस्वयंवराची रचना केली आणि आपला ग्रंथ राजसभेत वाचून दाखविला. तो ग्रंथ त्यातील रसाळपणामुळे रामदेवाला इतका आवडला की तो त्याच्या स्वतःच्या नावाने प्रसिद्ध व्हावा अशी लोभी इच्छा त्याला झाली. त्याने ती इच्छा प्रकट केली व नरेन्द्राला भारंभार सोने त्याबद्दल देऊ केले. राजाची इच्छा ही आज्ञा असते. तिचे पालन अटळ असते. नरेन्द्राला मोठा पेच पडला. पोटचे पोर दरोडेखोराला विकण्याची सक्ती व्हावी तसा तो प्रसंग. नरेन्द्र राजाला म्हणाला की राजाच्या नावावर ग्रंथ प्रसिद्ध करणे असेल तर तो संपूर्ण निर्दोष असणे बरे. त्यासाठी एकदा त्यावर नजर फिरवून तो ग्रंथ राजाला अर्पण केला जाईल असे सांगून नरेन्द्र घरी आला. तो आणि त्याचे दोन भाऊ यांनी रातोरात बसून ग्रंथाची नक्कल करावयास प्रारंभ केला. रात्रभर जागून फक्त नऊशे ओव्या लिहून पूर्ण झाल्या. सकाळी राजाचे दूत आले आणि त्यांनी मूळ ग्रन्थ जप्त करून नेला.

राजसत्तेच्या या पाशवी दर्शनामुळे नरेन्द्र राजसभेला विटला. आणि महानुभाव पंथात दाखल झाला. जाताना त्याने जिथवर नक्कल करून झाली होती तेवढाच आपला ग्रंथ बरोबर नेला होता. तो तेवढाच ग्रंथ महानुभावात मान्यता पावलेला आहे.

व्हीनस प्रकाशन : पुणे तीस

## नवी प्रकाशने

**नरेंद्र : रुक्मिणी-स्वयंवर**

आनंद साधले

**मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या**

शं. बा. जोशी

वसंत जोशी

**दीपगृह** (वि. स. खांडेकर यांची निवडक पत्रे)

संपादक : वि. वा. पत्की

**य. गो. जोशी : व्यक्ती व वाङ्मय**

सौ. सुनंदा दास

**नाथसंप्रदाय**

म. रा. जोशी

**जॉर्ज बर्नार्ड शॉ**

वि. ह. कुलकर्णी

'नरेंद्रपंडिताचे रुक्मिणीस्वयंवर' हा ग्रंथ महानुभाव पंथाने पवित्र मानलेल्या सात ग्रंथांतील एक ग्रंथ आहे. मराठीच्या भाषाशास्त्राच्या दृष्टीने पहाता महानुभावांचे ग्रंथ सांकेतिक लिपीत लिहिले गेले, ही घटना मोठी भाग्याची मानली जाते. कारण त्यामुळे तत्कालीन मराठी भाषेचे स्वरूप एका अनुस्वाराचाही फरक न होता जसेच्या तसे लिपिबद्ध राहिले आणि पुढील अभ्यासकांना उपलब्ध होऊ शकले. ही घटना अपूर्वाईची तर खरीच, पण यात्र घटनेचा परिणाम असाही झाला की महानुभावीय ग्रंथाच्या रसास्वादाला सामान्य वाचक पारखा झाला. सांकेतिक लिप्यांचे गूढ फोडण्याचा रोमांचकारी पराक्रम इतिहासाचार्य राजवाडे यांनी केल्यानंतर हळूहळू हे रसभांडार मराठीच्या महानुभावपंथेतर वाचकांना उपलब्ध होत आहे. पण अजूनही या उपलब्धीत सुलभता नाही. कारण या ग्रंथांचे आज देवनागरीत जे अवतार होतात ते सारे अभ्यासकांच्या सोयीसाठी असतात. रसिकाला जिद्द असेल तरच तो या अभ्यासकांशी दहीकाल्याची झुंबड लावून चार दोन रसबिंदू मिळवू शकतो.

रुक्मिणीस्वयंवराचा कर्ता नरेन्द्रपंडित हा ज्ञानेश्वरांना समकालीन होता. देवगिरीच्या उपान्त्य मराठा राजा रामदेवराव यादव याच्या राजसभेत तो बसे. त्याने रुक्मिणीस्वयंवराची रचना केली आणि आपला ग्रंथ राजसभेत वाचून दाखविला. तो ग्रंथ त्यातील रसाळपणामुळे रामदेवाला इतका आवडला की तो त्याच्या स्वतःच्या नावाने प्रसिद्ध व्हावा अशी लोभी इच्छा त्याला झाली. त्याने ती इच्छा प्रकट केली व नरेन्द्राला भारंभार सोने त्याबद्दल देऊ केले. राजाची इच्छा ही आज्ञा असते. तिचे पालन अटळ असते. नरेन्द्राला मोठा पेच पडला. पोटचे पोर दरोडेखोराला विकण्याची सक्ती व्हावी तसा तो प्रसंग. नरेन्द्र राजाला म्हणाला की राजाच्या नावावर ग्रंथ प्रसिद्ध करणे असेल तर तो संपूर्ण निर्दोष असणे बरे. त्यासाठी एकदा त्यावर नजर फिरवून तो ग्रंथ राजाला अर्पण केला जाईल असे सांगून नरेन्द्र घरी आला. तो आणि त्याचे दोन भाऊ यांनी रातोरात बसून ग्रंथाची नक्कल करावयास प्रारंभ केला. रात्रभर जागून फक्त नऊशे ओव्या लिहून पूर्ण झाल्या. सकाळी राजाचे दूत आले आणि त्यांनी मूळ ग्रन्थ जप्त करून नेला.

राजसत्तेच्या या पाशवी दर्शनामुळे नरेन्द्र राजसभेला विटला. आणि महानुभाव पंथात दाखल झाला. जाताना त्याने जिथवर नक्कल करून झाली होती तेवढाच आपला ग्रंथ बरोबर नेला होता. तो तेवढाच ग्रंथ महानुभावात मान्यता पावलेला आहे.

व्हीनस प्रकाशन : पुणे तीस